# अनुक्रमणिका

# जीवनकथा



" जन्मापासुन पाहिलीं वरवरीं तेवीस पानें पुरीं,
कोणा माहित आणखी कितितरी पाहीन या भूवरीं ?
दृष्टीदेखत आज पान सरलें; आलें नवें बाहिर,
जाणूं काय अम्हीं शुभाशुभ किती वाचील तो यावर ? "

दत्तात्रय कोंडो घाटे ऊर्फ कवी दत्त यांच्या चिमुकल्या काव्यसंग्रहात समाविष्ट झालेल्या या कवितेचे नाव आहे, " नवे पान उघडलें ! " आणि इंदूरला लिहिलेल्या या कवितेच्या तळाशी तिचा जो कालनिर्देश दिलेला आहे, तो आहे १ जानेवारी १८९८. त्याच वर्षी ६ जानेवारीला रेव्हरंड नारायण वामन टिळकांनी मुलांसाठी काढलेल्या 'बालबोधमेवा' या मासिकात ही कविता प्रसिद्ध झाली. – आज इतकी वर्षे उलटली, तरीही ती वाचताना मन नकळतच विषादाने भरून येते... आणि नियतीने टाकलेले जीवनमरणाचे हे न उलगडणारे कोडे मनाला अंतर्मुख करू लागते. कारण, तारुण्याच्या ऐन उमेदीतही हे भावगंभीर चिंतनशील उद्गार काढणाऱ्या कवीला, जीवानाच्या ग्रंथाचे फक्त एकच पान नंतर पाहता आले, आणि त्याच्या उत्सुक डोळ्यांपुढे तो ग्रंथ बघता-बघता कायमचाच मिटून गेला.

" कळी उमलली जों न पावली पूर्ण विकासाला
अदय करांचा तोंच तिच्यावरि पडला पण घाला " .

मराठीतील एक ज्येष्ठ कवी विनायक ( कै. विनायक जनार्दन करंदीकर ) यांच्या अन्य संदर्भातील वरील शोकपर उद्गारांचे स्मरण व्हावे असेच दत्तांचे हे अल्पकालीन आयुष्य. उमलण्यापूर्वीच मिटून गेलेल्या या अशा आयुष्यात, या नवथर तारुण्यातही दत्तांनी आपल्या गुणांनी आपल्या जिवाभावाच्या सुहृदांना कसा चटका लावला होता, याची मोठी हृदयस्पर्शी साक्ष, दत्तांच्या निधनानंतर, रे. टिळक आणि बडोद्याचे राजकवी

चंद्रशेखर ( कै. चंद्रशेखर शिवराम गोऱ्हे ) यांनी लिहिलेल्या शोकपर गीतांमध्ये मिळते एप्रिल १८९८ च्या ' सुविचार समागम ' मासिकात प्रसिद्ध झालेल्या " रसिकहो दत्त दूर गेला " या भावगीतामध्ये, आपल्या तरुण मित्राच्या अकाल मृत्यूचे दुःख टिळकांनी उत्कटपणे व्यक्त केले आहे. १९१९ साली कवी गोविंदाग्रज ( कै. राम गणेश गडकरी ) यांच्या मृत्यूनंतर लिहिलेल्या विलापिकेतही " तोच हो पुढे दत्ताला, अश्रूंची अंजलि देणें " अशी दुःखदायक आठवण टिळकांनी काढली आहे. दत्तांच्या निधनानंतर ' सुविचार समागम 'च्या संपादकांनी एप्रिल १८९९ च्या अंकात एक टीपवजा मृत्युलेख लिहिलेला आढळतो. " ज्यांच्या सरस कवितांचा समागम आमच्या वाचकांच्या हृदयास आल्हाद देत असे, ते आमचे मित्र, दत्तोपंत घाटे आपल्या सर्व मित्रांस दुःखसागरात लोटून स्वर्गवासी झाले. " या टीपेवरूनही आज सहजगत्याच जाणवते की, अवघ्या तेविसाव्या वर्षी जीवनाचा निरोप घेणाऱ्या या तरुण कवीच्या अकाल मृत्यूची दखल तत्कालीन वाङ्मयीन जगतानेही आवर्जून घेतली होती. १८९८ मध्ये दत्त बडोद्यास असताना ज्यांचा जिवाभावाचा स्नेह हे दत्तांच्या नादी कविमनाचे एक विश्रांतिस्थान होते, त्या चंद्रशेखरांच्या विलापिकेतील खालील ओळी आजही मन गलबलून टाकतात.

> " परि असो, जंव राहिन भूवरी
> तंव तुझ्या कवितेतिल माधुरी
> सतत सेवुनि मानिन धन्यता
> कवियशें मज भेटत जा अतां. "

दत्तांच्या या अत्यल्प जीवनाकडे, आज मागे वळून पाहाताना, त्यातील लौकिक घटनांपेक्षाही त्यांच्या कविमनाची आणि व्यक्तिमत्त्वाची जडणघडण करणाऱ्या सभोवतीच्या वातावरणाकडे आणि त्यातून उद्भवलेल्या संस्कारांकडेच मन अधिक केंद्रित होते; कारण घरच्या व दारच्या परिस्थितिजन्य संस्कारांचे वैपुल्य आणि महत्त्व दत्तांच्या जीवनात निःसंशय फार मोठे होते. त्यातूनच हे उत्कट, नादी कविमन घडत गेले, वाढत आले.

दत्तांचा जन्म २६ जून १८७५ रोजी अहमदनगर येथे झाला. घाटे कुटुंबाचे मूळ गाव अहमदनगर जिल्ह्यातील श्रीगोंदे हे असले तरी दत्तांच्या जन्मापूर्वीच काही पिढ्या हे घराणे नगरला स्थायिक झाले होते. दत्त हे आपल्या मातापित्यांचे एकुलते एक अपत्य. नगरच्या एका होतकरू कवीने, नगरच्या नव्या पेठेतील प्रमुख रहिवाशां-संबंधी जो एक मजेदार विनोदी कटाव रचला होता, त्यात " कोंडो राणोजींचं सारंच मोठं ! " अशी एक हलकीफुलकी गौरवपर ओळ आढळते. कोंडो राणोजी घाटे हे दत्तांचे वडील. नव्या पेठेतील त्यांचा वाडा हे एक लहानसे संस्थानच होते, आणि नगरच्या सार्वजनिक जीवनातही त्यांनी अंगच्या कर्तृत्वाने महत्त्वाचे स्थान मिळविले होते. घरच्या गरिबीतही जिद्दीने पुण्याला जाऊन पोटापुरते शिक्षण त्यांनी महाप्रयासाने संपादन केले आणि १८९० च्या सुमारास नगरला स्थायिक होऊन वकिलीची मुखत्यारीही

मिळवली. अंगचे कर्तृत्व आणि महत्त्वाकांक्षी स्वभाव यांमुळे त्यांची सर्वतोपरीने भरभराट होण्यास उशीर लागला नाही. या भाग्योदयाच्या काळातच, महाराष्ट्राच्या या तरुण कवीचा, दत्तांचा जन्म झाला. अनेक अडल्यानडल्या आप्तांना, पै-पाहुण्यांना आणि गरीब विद्यार्थ्यांनाही आसरा देणारे गजबजलेले घर, जातिभेदाचा पंक्तिप्रपंच नसलेले काहीसे सुधारकी वातावरण, आणि करड्या शिस्तीच्या अबोल वडिलांपेक्षाही कर्तबगार, प्रेमळ, रसिक आईचा सहवास या सगळ्यातच दत्तांचे बालपण गेले. दत्तांचे वडील दृढनिश्चयी आणि करारी; स्वकर्तृत्वावर त्यांनी संपन्नता आणि लौकिक मिळवलेला; वृत्ती अबोल, शिस्त कडक. पोटच्या एकुलत्या एक मुलावर निरतिशय माया असली तरी ती पोटातच होती, हृदय मोकळे होत नव्हते. चार शब्दांचीही देवघेव खुल्या दिलाने होत नव्हती. दत्तांच्या कोवळ्या, भावनाप्रधान मनाची त्यामुळे काहीशी कुचंबणा होऊन, मनानेही ते घरापासून दुरावले असल्यास नवल नाही. अर्थात या विशिष्ट कौटुंबिक परिस्थितीत तसे अपवादात्मक काहीच नव्हते. त्या काळातील कौटुंबिक वातावरण आणि संस्कार आणि त्यासंबंधीच्या सार्वत्रिक कल्पना या स्वरूपाच्याच असत.

खरे तर पूर्णार्थाने कोणीच कोणाला कवी करीत नाही. परंतु अंतर्यामीचे कवित्व उफाळून वर येण्यासही काही प्रेरणा मिळावी लागते. काव्यसाधनेतील ही पहिली प्रेरणा दत्तांना लाभली ती आपल्या आईकडूनच. आईला गाण्याची हौस; तिचा आवाजही मधुर. परशुरामतात्या गोडबोल्यांचे ‘नवनीत’च नव्हे तर कृष्णशास्त्री चिपळूणकरांचे मेघदूत, नामदेव – तुकारामांचे रसाळ अभंग आणि प्रार्थनासंगीतातील प्रेमळ भजनेही तिच्या ओठांवर नित्य खेळत असत. या बालकाचे भाग्य असे की, त्याला पाळण्यातच हे सारे ऐकता आले! मऊ मातीसारख्या त्या तरळ संवेदनशील बालमनावर या गीतांचा कळत-नकळत उत्कट संस्कार झाला असेल! दत्तांच्या मित्रमंडळींमध्ये भेंड्यांचा खेळही मोठा आवडता होता. या रंगणाऱ्या खेळाकरिता प्रत्येकजण कसून तयारी करी; कविता मुखोद्गत केल्या जात; ‘नवनीत’ या परशुरामतात्या गोडबोल्यांच्या काव्यसंकलनाची पारायणे होत; क्वचित् तशीच अटीतटीची वेळ आली तर शीघ्र काव्य रचूनही वेळ निभावली जाई! दत्तांच्या अशा सहेतुक, रचलेल्या काव्याचा आरंभ १८८९–९० सालीच झाला असावा. घरातच होणाऱ्या या भेंड्यांच्या खेळात दत्तांची आई व घरातील इतर स्त्रियाही सामील होत, हिरिरीने भाग घेत अशी माहिती दत्तांचे सुविद्य चिरंजीव आणि चरित्रकार कै. वि. द. घाटे सांगतात.

दत्तांच्या सर्वच कुटुंबावर आणि स्वतः दत्तांवरही त्यांच्या कोवळ्या, संस्कारक्षम वयातच फार मोठा प्रभाव पडला. तो सभोवतीच्या वातावरणाचा. विशेषतः या तरुण कवीच्या जीवनावर मोठा दूरगामी संस्कार झाला तो प्रथम नगरच्या आणि नंतर मुंबईच्या प्रार्थनासमाजाचा. दत्त विद्यार्थिदशेत असतानाच नगरला प्रसिद्ध सुधारक रावबहादूर शंकर पांडुरंग पंडित यांच्या सक्रिय प्रोत्साहनाने प्रार्थनासमाजाची चळवळ जोमाने वाढू लागली. नगरचे वातावरण त्यांनी बघताबघता पार बदलून टाकले. हिंदू धर्माची सुधारणा

करण्याच्या प्रेरणेमुळे मुंबईतील काही विचारवंतांनी ३१ मार्च १८६७ रोजी प्रार्थनासमाजाची स्थापना केली. प्रार्थना व सेवा यांच्या द्वाराच ईश्वराची पूजा करावी अशी या पंथाची धारणा असल्यामुळे त्याच्या प्रवर्तकांनी पंथाला 'प्रार्थनासमाज' असे नाव ठेवले. डॉ. आत्माराम पांडुरंग तर्खडकर हे या समाजाचे पहिले अध्यक्ष होत. जातिभेदाचा नाश, स्त्रीशिक्षणाचा प्रसार, विधवाविवाह, व बालविवाहबंदी ही समाजाने आपली चतुःसूत्री मानली होती. या संस्थेच्या प्रवर्तकांना मूर्तिपूजा मान्य नसल्याने परमेश्वराची अनन्य भक्ती हीच परमार्थसाधना म्हणून त्यांनी मनोमन स्वीकारली होती. कर्मवाद आणि अवतारवाद यांवर त्यांचा विश्वास नव्हता. न्या. रानडे, डॉ. भांडारकर, वा. आ. मोडक, वि. रा. शिंदे, चंदावरकर हे महाराष्ट्रातील प्रार्थनासमाजाचे प्रमुख कार्यकर्ते. दत्तांचे वडील १८७० च्या सुमारासच नगरला समाजाचे सभासद झाले आणि काही वर्षे समाजाचे कार्यकारी चिटणीस म्हणूनही त्यांनी प्रार्थनासमाजाची सेवा केली. कोंडो राणोजी आणि त्यांच्या पत्नी बाळूबाई दोघेही मोठे आतिथ्यशील, उदारमनाचे. साहजिकच नाना धर्मांचे, नाना जातींचे विद्वान पंडित, समाजसुधारक या सर्वांची त्यांच्या प्रशस्त वाड्यात सतत ये-जा असे. प्रार्थनासमाजाच्या वार्षिक उत्सवासाठी पुण्या-मुंबईहून रानडे-भांडारकरांसारखे महाभाग, तसेच कलकत्त्याहून ब्राह्मो समाजाचे व्याख्याते व उपासक आवर्जून येत असत. घाट्यांच्या घरी त्या सर्वांचाच राबता असे, कौटुंबिक उपासनाही होत असत. या थोर उपासकांच्या प्रवचनांनी, व्याख्यानांनी, उपासनांनी समाजात सतत चैतन्य खेळत असे. संवेदनाक्षम वयातच दत्तांना या थोर व्यक्तींचे दर्शन घडले, त्यांचे बहुमोल विचार त्यांच्या कानी पडले. भक्तिरसाने ओथंबलेल्या त्यांच्या उपासनांमध्येही त्यांचे कोवळे मन सुस्नात झाले. मॅट्रिक होऊन मुंबईला विल्सन कॉलेजमध्ये दाखल झाल्यानंतरही दत्त रानडे, चंदावरकर, भांडारकर, नवरंगे वगैरे तेथील समाजधुरीणांच्या उपासना आणि व्याख्याने ऐकण्यास आवर्जून जात असत. परिणामी दत्तांच्या जीवनात हे बौद्धिक आणि भावनिक संस्कार दृढमूल झाले. सामाजिक जाणिवा आणि प्रेरणा ऐन तारुण्यातच अंतर्यामी जाग्या झाल्या. सभोवतीच्या समाजजीवनाविषयी स्वतंत्रपणे विचार करण्याची प्रवृत्तीही निर्माण झाली आणि घरच्या व सभोवतीच्या उदार वातावरणात तीही जोपासली गेली. याचा अर्थ नगरमधील सारेच वातावरण या काळात आमूलाग्र पालटले होते, सुधारणाप्रवण झाले होते असे नव्हे. काही प्रमाणात ती उच्च मध्यमवर्गीय समाजाचीच बौद्धिक आणि म्हणूनच मर्यादित स्वरूपाची चळवळ होती. परंतु दत्तांना मात्र त्यांच्या सुदैवानेच हे संस्कारधन योग्य वयात लाभले. नगरमधील प्रार्थनासमाजाच्या चळवळीप्रमाणेच तेथील ख्रिश्चन मिशनऱ्यांचे संस्कारही दत्तांच्या कोवळ्या मनावर मोठ्या प्रभावी स्वरूपात उमटले. नगरला दत्तांचे मराठी शिक्षण आणि इंग्रजी दोन-तीन इयत्ताही एका खाजगी शाळेत झाल्यानंतर तेथील ख्रिस्ती मिशनचे प्रमुख रे. जे. स्मिथ यांच्या आग्रहामुळे दत्तांना मिशन हायस्कूलमध्ये पाठविण्यात आले. मॅट्रिक होईपर्यंत ते नगरला याच शाळेमध्ये होते. नगरचे मिशन हायस्कूल ही एक

आदर्श शिक्षणसंस्था बनविण्याच्या ध्येयाने प्रेरित होऊन स्मिथसाहेब आणि त्यांच्या पत्नी सतत झटत होत्या. या उभयतांचाही दत्तांवर आरंभापासूनच विशेष लोभ जडला आणि घरी करड्या शिस्तीच्या वडिलांपुढे दडपलेले दत्तांचे मनही या दोघांपुढे खुले होऊ लागले, एक जिव्हाळ्याचा ऋणानुबंध निर्माण झाला. शाळेमध्ये भरणाऱ्या रविवारच्या बायबलच्या वर्गास इतर मुले क्वचितच जात; परंतु दत्तांनी मात्र नियमितपणे त्या वर्गाला जाऊन बायबलचा अभ्यास केला. बायबलमधील काही कल्पनाविचारांचे पडसाद दत्तांच्या काही पुढील कवितांतून ऐकू येतात ते यामुळेच.

स्मिथसाहेबांमुळेच नगरच्या अमेरिकन समाजातही दत्तांच्या बऱ्याच ओळखी झाल्या, जीवनाचे, मनाचे क्षितिज विस्तारले. मिशन स्कूलमधूनच दत्त वयाच्या पंधराव्या वर्षी, १८९० मध्ये मॅट्रिक होऊन, पुढील शिक्षणासाठी स्मिथसाहेबांच्याच सल्ल्याने, मुंबईच्या विल्सन कॉलेजात दाखल झाले. मिशन हायस्कूलमध्ये आणि स्मिथसाहेबांच्या मार्गदर्शक सहवासात दत्तांच्या कोवळ्या मनावर सामाजिक सुधारणेचे, तसेच इंग्रजी काव्याचे व वाङ्मयीन रसिकतेचेही संस्कार झाले; अभिरुचीच्या कक्षाही वाढल्या. याच काळात रेव्हरंड टिळक यांच्याशीही दत्तांचा स्नेह जुळला. टिळकही त्या काळात आपल्या जीवनातील मोठ्याच संक्रमणकालातून जात होते. त्यांनी नुकतेच धर्मांतर केले होते, आणि त्यामुळे दुरावलेल्या आपल्या सहचरीची साथ त्यांना अद्याप लाभली नव्हती. अशा मनःस्थितीत उभयतांच्या वयातील अंतरही नाहीसे होऊन टिळकांचा जिव्हाळ्याचा स्नेह तर दत्तांना लाभलाच, पण आई-वडिलांच्या उदार वृत्तीमुळे घाटे कुटुंबातही टिळक घरचेच झाले. दत्तांची कविता या काळात नुकतीनुकती अंकुरत असली तरी ती अंतर्मनात खोलवर रुजण्यास टिळकांसारख्या वडीलधाऱ्या समानधर्मी स्नेह्याचा सहवास निश्चितच मोठा प्रेरक ठरला. मॅट्रिकचा रिझल्ट लागण्याच्या सुमारास दत्तांचा विवाह झाला. नगरजवळील घोसपुरी येथील राजमाने कुळातील चंद्राबाई दत्तांची पत्नी झाली. लग्न झाले तेव्हा तिला अक्षरओळखही नव्हती, आणि लग्नानंतर सासरी, तिला लिहिणे-वाचणे व कशीदाकाम शिकविण्याची व्यवस्था झाली, तरी शिक्षणात तिची विशेष प्रगती होऊ शकली नाही. ज्याच्या जीवनाचे आणि आकांक्षांचे क्षितिज असे विस्तारत होते, आणि नव्या जीवनाची, स्त्रीत्वाची व प्रीतीची काव्यात्म स्वप्ने अंतर्यामी उमलू लागली होती, अशा तरुण कविमनाला संसारात साथ मिळाली ती या अज्ञ बालपत्नीची! ख्रिश्चन मिशनऱ्यांच्या सहवासात दत्तांच्या मनावर संस्कार झाले होते ते स्त्री-पुरुषांमधील मोकळेपणाचे! इंग्रजी काव्याच्या वाचनानेही त्यांचे मन फुलू लागले होते, आणि त्या संवेदनाशील वयात निव्वळ प्रेमकल्पनेचेही एक विलक्षण आकर्षण मनात निर्माण झाले होते. या विरोधी पार्श्वभूमीवर, या पति-पत्नींमधील मूळचेच अंतर अधिक तीव्रतर झाले असल्यास नवल ते काय? संसारसतारीच्या या तारा दुर्दैवाने कधीच जुळू शकल्या नाहीत आणि मैफिल रंगली नाही! त्या काळातील कितीएक रसिक मनांना हेच कटू सत्य कधी त्राग्याने व अगतिकतेने, तर कधी संयमाने स्वीकारावे लागले होते आणि तो

दोष दुर्दैवाने नेहमीच प्रपंचातील त्या बालसहचरीचाही नव्हता! परिस्थितीचे कठोर अंतर आणि परिणामी मनामनांमधील दारुण विसंवाद यांचेच ते अटळ पर्यवसान होते, दुःखद प्राक्तन होते! दुर्दैवाने या संक्रमणकालातील दत्तांच्याही वाट्यास हाच विषादजनक अनुभव आला होता.

मुंबईला विल्सन कॉलेजमध्ये प्रवेश घेण्यासाठी दत्तांनी आयुष्यात प्रथमच नगरचा आणि आपल्या घराचा निरोप घेतला. घराच्या आणि मातापित्यांच्या छायेखाली वाढलेले त्यांचे बंदिस्त जीवन यापुढे आपल्या कलंदर, नादी, रसिक मनाच्या लहरींनुसार स्वतंत्र-पणे झुकत गेले, झेपावत गेले – परिणामी १८९१ साली ते कॉलेजात दाखल झाले असले तरी त्यानंतरची उणीपुरी चार वर्षे इंटरची परीक्षा काही त्यांच्या पदरात पडली नाही. कधीकधी मुंबईची हवा न मानवल्याने अधूनमधून आजारी पडूनही त्यांना नगरला घरी परतावे लागले. स्वच्छंद जीवनाची ही पहिलीवहिली मधुर चव घेत असतानाच त्यांची कविताही त्यांच्या जिवाचा ठाव घेऊ लागली. मात्र १८९८ पर्यंत, पुरेपूर आठ वर्षे बी. ए. ची उपाधी त्यांना मिळवता आली नाही. या काळातील त्यांच्या जीवनाची स्वच्छंद लकेर आणि त्यांच्या अधिऱ्या, अतृप्त अंतरंगाचे रहस्य आज प्रयत्न करूनही कसे कळणार? कुणाला कळणार? नगरला घरामध्ये त्यांना कोणीच समवयस्क नव्हते, थोरामोठ्यांची ये-जा सतत सुरू होती, वडील करड्या शिस्तीचे आणि अबोल. या सर्वांचे एक दडपण त्यांच्या मनावर आले असल्यास नवल ते काय? दत्तांची मूळ वृत्ती उत्कट, मनस्वी आणि स्वतःला आवेगाने झोकून देणारी होती. मुंबईच्या काहीशा स्वच्छंद जीवनात त्यांच्या दडपलेल्या प्रवृत्तींची विरोधी प्रतिक्रियाही काही काळ मुक्तपणे उमटली असल्यास नवल नाही. या कालखंडातील दत्तांच्या अस्वस्थतेचे विश्लेषण करू पाहाणे म्हणजे एका भावनाप्रधान कवीच्या अतर्क्य आयुष्याची छाननी करणे होय – त्यांच्या भावगर्भी मनाचे एकाकीपण, आणि त्यांच्या अतृप्त हृदयाच्या उफाळत्या ऊर्मी या सर्वांचे पुरते मर्म आज प्रयत्नांतीही हाती येणार नाही. दत्तांचे मन मूळचेच कलासक्त असले तरी स्वतःच्या घरात मात्र तसे अनुकूल कलात्मक वातावरण त्यांना लाभले नव्हते. मुंबईच्या स्वतंत्र, मोकळ्या वातावरणात या कलासक्त मनाला खुले, मुक्तद्वार मिळाले, रसिकता फुलत गेली, कदाचित तशाच रसिक, नादी मित्रमंडळींचीही भर त्यांच्या नव्या स्नेहवर्तुळात पडली असावी. संगीत आणि सतारवादन यांच्याकडेही त्यांचे मन ओढ घेऊ लागले. या परिवर्तनाची चाहूल नगरला त्यांच्या घरी लागून, कदाचित घरच्या कौटुंबिक वातावरणातही ताण निर्माण झाले असतील. दत्तांच्या ठिकाणी मूळचीच कविवृत्ती असली, टिळकांनी ती नगरलाच रुजविली असली तरी त्यांची खरी कविता अद्याप प्रकट झाली नव्हती. घरचे घरंदाज भक्तिप्रवण वातावरण आणि मुंबईचे हे नादी कलासक्त जीवन यामध्ये दत्तांचे भावनाप्रधान कविमन आंदोलत होते. विल्सन कॉलेजात येण्यापूर्वी दत्त पूर्णार्थाने कवी नव्हते; खरे कवी नव्हते. कॉलेजातच त्यांची खरी जिवंत काव्यस्फूर्ती जागृत झाली आणि चिमुकल्या फुलपाखरांप्रमाणे किंवा वारा

प्यालेल्या लहानग्या वासराप्रमाणे अपूर्व उत्साहाने, स्वैरपणे उडू बागडू लागली. याच काळात त्यांनी मनसोक्त वाचनही केले आणि आपल्या पदवी परीक्षेची रेंगाळलेली गाडी एकदाची मार्गी लावण्यासाठी कलकत्ता विद्यापीठाच्या अधिकार क्षेत्रातील इंदूरच्या मिशन कॉलेजात ते दाखल झाले.

इंदूरच्या शांत व निवांत वातावरणात मात्र दत्तांच्या क्षुब्ध, अस्थिर मनाला समाधान लाभले, त्यांच्या मनोवृत्तींना स्थैर्य आले. याच काळात दत्तांना गायन-वादन-कलांचाही ध्यास लागला होता. गायनकलेचा जरी त्यांनी शास्त्रोक्त अभ्यास केला तरी तिच्याविषयी त्यांची प्रसिद्धी झाली नाही. परंतु सतार आणि हार्मोनियम या वाद्यांमध्ये मात्र त्यांनी नैपुण्य मिळवले. त्यांच्या मृत्यूनंतर त्यांच्या परमस्नेह्यांनी, काव्यप्रतिभेबरोबरच त्यांच्या वादननैपुण्याचाही उल्लेख आवर्जून केला आहे. " सुरवधूहूनही बोलकी तव सतार आता मूक का " या उद्‌गारांचे स्मरण येथे झाल्यावाचून राहात नाही. दत्तांच्या अनेक सुंदर कविता इंदूरच्या त्या वर्षदीडवर्षातच लिहिल्या गेल्या आहेत. १८९८ मध्ये, बी. ए. झाल्यानंतर दत्त नगरला फार दिवस राहिले नाहीत. त्यांच्या स्वयंपूर्ण, स्वतंत्र वृत्तींना घराचे बंधन तसे कधीच मानवणारे नव्हते. त्या काळात बडोदा संस्थानात होतकरू मराठा तरुणांना नोकरीच्या दृष्टीने खूपच वाव होता. म्हणूनच दत्त १८९७ मध्ये बडोद्याला गेले. दामोदरशेट यंदे यांच्या ' सयाजी विजय ' या साप्ताहिकाची कचेरी हे बडोद्यातील त्याकाळचे एक महत्त्वाचे बौद्धिक केंद्र होते. ' सयाजी विजय ' साप्ताहिकात दत्तही आवडीने लेखन करू लागले. पॅरिसला भरणाऱ्या भव्य प्रदर्शनात आपल्याकडील गायनवादन कलांचे प्रात्यक्षिक दाखविण्यासाठी नावाजलेल्या गवयांना व वादकांना घेऊन पॅरिसला जाण्याचे महत्त्वाकांक्षी बेतही ते करू लागले. ऐन तारुण्याचा भर, काव्यात्मवृत्ती, अनंत वाटांनी उफाळणाऱ्या उत्कट मनःशक्ती – डोळ्यांपुढे भविष्यकाळाची उज्ज्वल स्वप्ने – आणि ती प्रत्यक्षात आणण्याचा मनस्वी जिवाला जडलेला ध्यास – बडोद्याच्या त्या प्रगतिशील उत्साही वातावरणात काय करू आणि किती करू असे त्यांना झाले असल्यास नवल नाही! बडोद्याला ' उत्तररामचरित ' ह्या संस्कृत नाटकाचा मराठी अनुवाद करण्यास त्यांनी आरंभ केला. त्यापूर्वीच १८९५ साली इंदूरचे श्रीमंत शिवाजीराव होळकर यांच्या जाहिरातीवरून दत्तांनी संस्कृत ' मेघदूतां 'स मराठी नाट्यरूपही दिले होते अशी नोंद आढळते. दुर्दैवाने या नाटकाचे हस्तलिखित इंदूरच्या दफ्तरखान्यात केव्हातरी गहाळ झाले, पुढे त्याचा पत्ताही लागला नाही! बडोद्यास ' उत्तररामचरित् ' लिहिले जात असतानाच, त्यांचे लक्ष अर्वाचीन कवींच्या काव्याकडे लागले होते.

अर्वाचीन कवितेचे ते स्वतःही एक पाईक होते, एकनिष्ठ उपासक होते. परशुरामतात्या गोडबोल्यांनी ' नवनीत ' या काव्यसंग्रहात कवितांचे जे संकलन केले, ते रामजोशांपाशीच थांबले होते. पुढील कवींचा परामर्श कुणीही न घेतल्याने आधुनिक कवींच्या उत्कृष्ट कविताही वृत्तपत्रे आणि मासिके यांच्या रद्दीत पडून लुप्तप्राय होत होत्या. म्हणूनच

पुढील कविपरंपरा विद्यमान कवींपर्यंत भिडवून ती महाराष्ट्रास सादर करण्याचा मोठा महत्त्वाकांक्षी संकल्प दत्तांनी केला.

दिवंगत आणि विद्यमान अर्वाचीन कवींच्या काव्याचे संशोधन आणि संग्रह करण्यासही हिरिरीने आरंभ झाला, विद्यमान कवींशी त्यानुसार पत्रव्यवहारही सुरू झाला. या अभिनव उपक्रमासाठी केशवसुत आणि टिळक यांनी आपल्या कविता पाठवल्या असल्याचीही नोंद दत्तांच्या चरित्रात आढळते. अर्वाचीन मराठी काव्याचे अशा स्वरूपाचे संकलन करण्याचा मराठीतील हा पहिलाच प्रयत्न असावा. आणि वयाची विशी नुकतीच ओलांडलेल्या दत्तांसारख्या नव्या दमाच्या तरुण कवीने तो सुरू करावा हे निःसंशय महत्त्वाचे तर खरेच, परंतु या गौरवापेक्षाही खरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे अर्वाचीन मराठी कवितेची महती दत्तांना इतक्या अल्पावधीमध्येच जाणवली होती आणि तिच्या विकासाची, भविष्याची जाणही त्यांच्या मनात निर्माण झाली होती! परंतु नियतीनेच या उमलत्या जीविताला असा अकाली पूर्णविराम दिल्यामुळे दत्तांच्या अनेक आकांक्षा व संकल्प दुर्दैवाने अपूर्णच राहिले. त्यांचे ज्येष्ठ कविमित्र 'चंद्रशेखर' यांनी 'अर्वाचीन कविता' या नावाने हे संकलन पुढे पूर्ण करून २३ डिसेंबर १९०३ या दिवशी आपल्या दिवंगत मित्राच्या स्मृतीस ते अर्पण केले. मात्र या अभिनव संग्रहामध्ये टिळक, केशवसुतादी तत्कालीन तरुण कवींच्या कविता अंतर्भूत करण्यात आल्या नाहीत. दत्तांची अर्वाचीन कवितेकडे पाहण्याची जिव्हाळ्याची स्वागतशील दृष्टी आणि चंद्रशेखरांची पारंपरिक पंडितीवृत्ती यांतील विरोधामुळेही बहुधा असे घडले असावे! अर्वाचीन कवितेकडे असलेली दत्तांच्या मनाची दुर्दम्य ओढ आणि तिची एक सलग एकसंध प्रतिमा रसिकांपुढे सादर करण्याची धडपडच या प्रयत्नामधून दिसून येते.

१८९९ साली बडोद्यास प्लेगने केवळ प्रलय मांडला होता. चंद्रशेखर आपल्या वडील बंधूंसह शहराबाहेर दूर धर्मशाळेत राहावयास गेले होते. दत्त मात्र प्लेगच्या तशा कहरातही आपले परममित्र बापूसाहेब दिघे यांच्या घरीच राहात होते. कडाक्याच्या थंडीतही मैल–दीड मैल अंतर चालून, रोज रात्री दत्त चंद्रशेखरांकडे जात, आणि काव्यानंदाची अपूर्व धुंदी आपल्या कविमित्राच्या सान्निध्यात अनुभवीत. सभोवती मृत्यूचे थैमान चाललेले..., पण जीवनमरणाच्या याच भयावह विपरीततेमध्येच दत्तांची कविता मात्र मुक्तपणे फुलत होती. याच दिवसांत त्यांच्या 'सख्या वसंतवाताने' बहार केली. रात्रीच 'प्रभात' होऊन 'बाई लतिके' निशी 'मुग्ध कलिका' झुरून राहिली, आणि 'कोकिल–कूजित' ऐकून 'बवसी अंत किती राजसे' हे मोहक प्रियागायनही होऊ लागले. संगीत "उत्तररामचरिता"ची उभारणीही याच काळात सुरू होती. आज इतक्या वर्षांनंतरही या कालखंडाकडे मागे वळून पाहातानाही मनावर संस्कार उरतो, तो केवळ या तरुण कवीच्या अपूर्व काव्यनिष्ठेचा, दुर्दम्य काव्यसाधनेचा!

ज्या जीवनावर आणि सृष्टीवर दत्तांनी अपार प्रेम केले, त्या जीवनाचा निरोप घेण्याची वेळ आता जवळ आली होती... काव्यनंदात, नवनव्या संकल्पात आणि

प्रेमस्वप्नात गढलेल्या या नादी कलावंताला मात्र काळाच्या निर्घृण पावलांची चाहूलही लागली नव्हती. बडोद्यालाच १८९९ च्या मार्च महिन्यात दत्तांना अखेरीस प्लेगने गाठले. या तरुण जीवनाची सारी स्वप्ने उमलण्यापूर्वीच अशी नष्ट करताना काळालाही अवघड गेले असावे. कारण आरंभीच्या दुखण्याचा जोर ४-५ दिवसांत कमी झाला. मित्रांनी सुटकेचा निःश्वास सोडला. याच वेळी ज्यासाठी बडोद्याला वास्तव्य केले होते, तो सरकारी नोकरीचा हुकूमही हाती आला. पण दैवाचा दुर्विलास असा की दुसऱ्याच दिवशी दुखणे उलटले. ताप अनावर वाढला, शुद्ध हरपली. अंगाची तळमळ आणि लाही असह्य होऊ लागली. पण समोवती जमलेल्या मित्रांचे अश्रू पाहूनही दत्तांना मरण जवळ आले आहे हे खरेच वाटेना ! त्या वेदनाभरातही ते मित्रांना सांगू लागले, " अरे, असे वेड्यासारखे काय करता ? मी मरतोय थोडाच ! " कालपुरुष हे शब्द कुठेतरी ऐकत असावा..., रात्र कशीबशी उलटली, अखेरची चिन्हे दिसू लागली .. चंद्रशेखरांचे वडील बंधू नानासाहेब कोर्टात जाताना दत्तांची प्रकृती पाहण्यास आले. मृत्युशय्येवर तळमळणारे दत्त तशा अवस्थेतही त्यांना पाहून म्हणाले, " नानासाहेब, क्षमा करा, आपण आलात आणि मी असा अस्ताव्यस्त पडलो आहे. " जीवनाचा निरोप घेऊन एक पाऊल परलोकात टाकलेले, अशा अवस्थेतील दत्तांचा तो हृदयद्रावक विनय पाहून समोवतीच्या स्नेह्यांना आपले दुःख अनावर झाले. दत्तांनीही अखेर आपला अन्तकाळ जवळ आला आहे हे जाणले. वयाची पंचविशीही न गाठलेल्या त्या तरुण मनात त्या शेवटच्या क्षणांमध्ये कोणत्या भावनांची गर्दी झाली असेल ? जन्मदाते आई-वडील फार दूर होते, त्यांच्या भेटीची आता आशा नव्हती. लहानगा मुलगा आणि आयुष्याची सोबतीण... मात्र जवळ होती. या अंतकाळीही आपल्या पोरक्या मुलाचे, वृद्ध माता-पित्यांचे आणि निराधार, गरोदर पत्नीचे स्मरण त्यांना झाले नसेल असे कसे म्हणावे ? परंतु त्या भावनांना अखेरीसही शब्दांचा स्पर्श झाला नाही. आपल्या अर्धमृत हाताने जीवापाड जपलेली आपली कवितांची वही दत्तांनी चंद्रशेखरांजवळ दिली आणि ' हिला सांभाळा ' म्हणून प्राण सोडला. सारे संकल्प आणि आकांक्षा मागे ठेवून मार्चच्या त्या १३ तारखेस दत्तांनी जगाचा निरोप घेतला. त्यांची कविता आणि त्यांची सतार कायमची अबोल झाली. आधुनिक कवितेच्या नवप्रवर्तनामध्ये ज्यांचे स्थान महत्त्वाचे होते असे एक कलासक्त, काव्यप्रेमी जीवन अकाली, फार अकाली संपुष्टात आले...

१९२१ साली, उण्यापुऱ्या बावीस वर्षांनंतर त्यांचे सुविद्य चिरंजीव कै. वि. द. घाटे यांनी मोठ्या परिश्रमपूर्वक त्यांच्या कवितांच्या संपादनाचा प्रपंच केला, तेव्हाच त्यांची संकलित कविता आणि त्यांच्या जीवनाची रूपरेखाही रसिकांपुढे आली.

—कवी दत्तांच्या लौकिक जीवनाची ही अशी आकस्मिक खंडित झालेली कहाणी ! या जीवनाकडे आज मागे वळून पाहाताना, आणि जिव्हाळ्याने विचार करताना मनोमन जाणवते की, खऱ्या कर्तृत्वाची, काव्यसाधनेचीही केवळ पाच-सात वर्षेच दत्तांना जीवनात लाभली ! या अल्पकाळात काय घडले असेल ? नकळत्या, अजाण वयानंतर नवथर

तारुण्य ओसरतानाच, स्वतःच्या प्रवृत्तींची, व्यक्तिमत्त्वाची खरी जाण त्यांच्या अंतर्मनात हलकेहलके निर्माण झाली असेल...जाणिवेचे, संवेदनेचे विश्व हळूहळू समृद्ध झाले असेल, जन्मजात रसिकतेला आणि अभिरुचीलाही धुमारे फुटले असतील... आणि या सगळ्यांतूनच भावी जीवनाचे, निर्मितीचे स्वप्न त्या उत्सुक, तरुण डोळ्यांपुढे साकार झाले असेल... या अल्पकालीन जीवनाचा असा विचार करतानाच, उत्कटपणे जाणवते की, त्या अपरिपक्व तारुण्यातही दत्तांच्या नादी कलासक्त मनाला, स्वतःची ओळख पटली होती. संपूर्ण आत्मविश्वासाने, आत्मप्रत्ययाने आविष्कार करण्याइतकी स्वतःच्या अंतरंगाची, ध्येयाचीही जाण त्यांच्या ठायी निर्माण झाली होती, यातच त्यांच्या कवी प्रकृतीचे आणि व्यक्तिमत्त्वाचेही फार मोठे वैशिष्ट्य साठवले आहे. या अल्पकालीन जीवनामध्येही सतत उभे होते ते एक उत्कटपणे नादावून जगलेले जिद्दी, कलासक्त, मनस्वी व्यक्तिमत्त्व! बाह्य जीवनाच्या सांकेतिक, रूढ चौकटी ओलांडून आपल्या भावविश्वात रमलेले...दत्तांचे तेच खरे आन्तरजीवन होते! हे जीवन अनेक दिशांनी विकसत होते, प्रगतीच्या, आत्माविष्काराच्या वाटा सहज प्रेरणेने शोधीत होते, परंतु या सगळ्यामध्येही पहिले आणि खरे प्रेम होते ते कवितेचेच.

> " महापरीक्षा झाली, आली विद्या अथवा कला
> तरी मी तुजवांचुनि एकला..."

हे भावप्रवण उद्गार यांनीच आपल्या कवितासखीला उद्देशून काढले होते. ही उदंड काव्यनिष्ठा, हे अतूट प्रेम म्हणजे नवथर तारुण्यातील केवळ एक छंद नव्हता, एक तात्कालिक वेड नव्हते. किंवा तत्कालीन अतिशयोक्तिपूर्ण संकेतही नव्हता. "जिच्याकरिता जन्म या जगीं झाला" ही खूण त्यांच्या अंतर्यामी खोलवर पटलेली होती. ती अवघ्या अस्तित्वाचीच तहानभूक होती आणि विशेष हे की, अपरिपक्व अशा ऐन तारुण्यातही दत्तांनी हे प्रेय, हे श्रेय मनोमन जाणले होते!

# शिशुगीते



दत्तांची बालगीते मोजकीच असली तरी मराठी रसिकांनी ती एकमुखाने वाखाणली आहेत. काळाच्या चाळणीतून गळून न जाता त्यांचे अम्लान सौंदर्य रसिकमनात आजतागायत टिकून राहिले आहे. बालगीत किंवा शिशुगीत हा प्रकार आज सार्वत्रिक झाला असला तरी त्या संदर्भातील काही अपसमज आजही प्रचलित आहेत. म्हणूनच बालगीताची संकल्पना पुन्हा एकदा तपासून पाहाणे इथे अप्रस्तुत ठरणार नाही.

बालगीत हा गीतरचनेमधील एक स्वतंत्र प्रकार. बालमनाचाच एक स्वाभाविक आणि उत्स्फूर्त आविष्कार. बालप्रवृत्तींची नैसर्गिक, कल्पनाप्रचुर अभिव्यक्ती. अवखळ, नादी, कल्पक व कुतूहलप्रिय अशा बालवृत्तीचा गाभा बालगीतामधून नेमका दिसावा लागतो; या बालप्रवृत्तीचेच मर्म, तिचेच निखळ वैशिष्ट्य बालगीतांतून सहजपणे व्यक्त व्हावे लागते. नव्या, ताज्या जीवनरसाने ओथंबलेले, दृष्टीपुढे येणाऱ्या प्रत्येक नवनवीन गोष्टींविषयीच्या अपार कुतूहलाने भरलेले आणि स्वतःचे असे एक स्वतंत्र, कल्पक भावविश्व सहजगत्याच निर्माण करणारे बालमन, त्याच्या अल्लड, स्वैर कल्पकतेनिशी या बालगीतांतून ठायीठायी प्रकट झाले, म्हणजेच ही गीते खरी बालगीते होतात. एरवी बालभाषेच्या केवळ वरपांगी अनुकरणामधून खरी बालगीते निर्माण होत नाहीत. बालकाच्या आवडीच्या, हौसेच्या, जिव्हाळ्याच्या गोष्टी, त्याच्या स्वाभाविक नाट्यप्रेमामुळे सभोवतीच्या साध्या गोष्टींनाही होणारा अद्‌भुताचा स्पर्श, त्याच्या कल्पनाशक्तीचे स्वच्छंद भ्रमण, अभिनयाचे व साक्षात् दृग्गोचर होणाऱ्या चित्रमयतेचे वेड, ही सारी बालवृत्तीचीच वैशिष्ट्ये होत. अशा या बालमनात आणि बालविश्वात प्रौढ मन कसे व किती प्रविष्ट होऊ शकते, समरस आणि एकरूप होते, यातच बालगीताचे यश सामावलेले असते. म्हणूनच केवळ बालकांविषयीचे प्रेम आणि कौतुक किंवा बालकांना रिझविण्याची मनोमन इच्छा यातून खऱ्या बालगीतांची निर्मिती होऊ शकत नाही. बालमनामध्ये अलगद शिरून, आपल्या हरपलेल्या शैशवाचा पुनःप्रत्यय घेण्याची कवीची

शक्ती किती अस्सल व पूर्ण आहे, यावर बालगीतांची सच्ची निर्मिती अवलंबून असते. बालवृत्तीचा हा खराखुरा कस हेच बालगीतांचे अविभाज्य वैशिष्ट्य होय. बालमन जसे अनेकदा प्रौढांचे अनुकरण करते, तसेच आपल्या मनोमय इच्छांचे व आपल्या बालविश्वातील सुखदुःखांचे आरोपण जवळच्या, आवडत्या गोष्टींवर करीत असते, आणि त्याच्या बालसुलभ कल्पकतेचे मनोहर रंग या सगळ्यांत मिसळलेले असतात. ' मोत्या, शीक रे अ आ ई ', ' शहाणी बाहुली ', ' बोलत कां नाही ', ' आंदोलन, ' या दत्तांच्या बालगीतांतील बालमनाला सहज मोहविणारे भावस्पर्शी नाट्य, आणि त्यांचे अकृत्रिम, लडिवाळ स्वरूप पाहाण्यापूर्वी मराठी बालगीतांची वाटचाल एकदा ओझरती पाहावयास हवी.

बालभाषेत लिहिलेली आणि बालभावना प्रकट करणारी अनेक बालगीते जुन्या मराठी वाङ्मयातही आढळतात. साधारणतः १२ व्या शतकापासून प्राचीन मराठीतील संतकवींनी आणि त्यानंतर पंडितकवींनी लिहिलेल्या बालगीतांचे विषय साहजिकच श्रीकृष्ण आणि त्याच्या बाललीला हेच होते. निर्गुण परब्रह्माचे हे साजिरे गोजिरे सगुण स्वरूप वर्णन करताना हे कवी नकळताच बालमनाशीही समरस होत. म्हणून श्रीकृष्णाच्या गोकुळातील खोड्या व क्रीडा, त्याचा गोपाळकाला, जलविहार, वनविहार अशा अनेक खेळकर प्रसंगांवर प्राचीन मराठी कवींनी ही बालगीते तन्मयतेने रचली. अधूनमधून काही तात्त्विक आणि आध्यात्मिक स्वरूपाचा प्रतीकात्मक भाग त्यांत आला असला तरी कधीकधी तोही दृष्टिआड होऊन, निखळ बालवृत्तीच्या छटाही काही गीतांत सहजपणे दिसतात. ज्ञानेश्वर, एकनाथ इत्यादी संतकवींनीही बालकृष्णाच्या लीला चित्रित केल्या आहेत, परंतु नामदेवांच्या अभंगांतून व गौळणींतून आढळणारे त्यांचे दर्शन विशेष भावस्पर्शी आणि विलोभनीय आहे. " किस्ना, थमाल रे थमाल अपुल्या गाई " किंवा " असा कसा देवाचा देव बाई ठकडा " ही गीते त्यांतील बोबड्या बालभाषेमुळे तर अधिकच स्वाभाविक आणि सरस उतरली आहेत. मात्र तुकारामादी इतर संतांच्या अशाच बालक्रीडेच्या अभंगांमधील भाषा ही जशी बालभाषा नाही, तशाच त्यांतील भावनाही बालभावना नाहीत. त्यांतील प्रत्यय हा बालमनाचा प्रत्यय नसून कविमनातील वात्सल्य आणि भक्ती यांचाच तो आविष्कार होय. वामन पंडितांच्या ' वनसुधा ', ' वेणुसुधा ' या काव्यांतूनही कृष्णलीला चित्रित केल्या असल्या तरी त्यांतूनही बालमन डोकावत नाही. ही वर्णने सकृद्दर्शनी बालक्रीडांची वाटली, तरी त्यांच्या अंतर्यामी या पंडितकवींची गंभीर, आध्यात्मिक वृत्तीच जाणवते. मुलींनी झोपाळ्यावर बसून म्हणावयाच्या मोरोपंतांच्या " सीतागीता "चे स्वरूपही याहून वेगळे नाही. अर्वाचीन मराठी काव्याकडे वळावे, तर टिळक आणि गोविंदाग्रज यांच्या अनुक्रमे ' ताई, तू फूल गडे ' किंवा ' बागेत बागडणाऱ्या लाडक्या लहानग्यास ' यांसारख्या प्रसिद्ध कवितांमधून प्रौढांच्याच वत्सल किंवा चिंतनशील भावना किंवा कविमनाच्या कल्पकतेच्या भराऱ्याच प्रकर्षाने आढळून येतात.

बालगीतांची खरीखुरी लोभस व स्वभाविक ओळख पटते ती मराठी लोकसाहित्यामधूनच. भावाबहिणीच्या ओव्या, आईची अंगाईगीते, याखेरीज लहान मुलींच्या फुगड्या, झिम्मा, उखाणे, भोंडला इत्यादी खेळांच्या निमित्ताने मराठी बोलीभाषेत अनेक सुंदर लोकगीते आढळतात. "आपडी थापडी, गुळाची पापडी," "चांदोबा चांदोबा भागलास का ?" ही घरगुती शिशुगीते कुणाच्या परिचयाची नाहीत ? ही गीते आजवर परंपरेने अव्याहत चालत आली आणि पुढेही ती घराघरातून सतत ऐकू येतील. त्यांची घरगुती बोलीभाषा, लडिवाळ बालभाषा आणि अभिनयाला आवश्यक असलेले नाट्यगुण यामुळेच पिढ्यान्‌पिढ्या घराघरांतून निनादत आलेल्या या बालगीतांना काळाची बाधा होऊ शकली नाही.

प्राचीन मराठी काव्यात बालगीतांना ही अशी पार्श्वभूमी आणि परंपरा असली तरी शिशुगीतांचे हे गोजीरवाणे रोपटे खऱ्याखुऱ्या अर्थाने मराठी कवितेच्या भूमीत तसे कधीच रुजले नव्हते. बालकाचे संवेदनक्षम, कुतूहलप्रिय मन, त्याची नैसर्गिक अनुकरणप्रवृत्ती, तरळ खेळकर कल्पनाशक्ती, आणि अभिनयाची व तालबद्धतेची स्वाभाविक आवड या साऱ्यांतून बालकांचे चिमुकले भावविश्व आणि त्यांचीच मनोवृत्ती साकार करणारी खरीखुरी शिशुगीते मराठी कवितेत जवळजवळ अभावानेच होती. शिशुगीतांच्या स्वरूपात जे काव्य लिहिले गेले, ते बालांसाठी नव्हते, बालांचे नव्हते, तर बालांसंबंधीचे होते. प्रौढांनी बालकांसंबंधी लिहिलेल्या या काव्यांतून प्रौढांच्याच वत्सल प्रेमाच्या, कौतुकाच्या भावना व्यक्त झालेल्या दिसतात आणि अनेकदा त्यांच्याच कल्पना–भावना-विचारांचे आरोपण बालमनावर केलेले आढळते.

दत्तांचे ज्येष्ठ कविमित्र रे. ना. वा. टिळक यांचे वर्णन आजवर 'फुलामुलांचे कवी' असेच केले गेले. टिळकांच्या काव्यातील प्रेमळ वात्सल्य त्यांच्या प्रासादिक शैलीमुळे द्विगुणित झाले असले तरी बालमनात प्रवेश करून लिहिलेली खरीखुरी शिशुगीते टिळकांच्या काव्यसंभारातही तशी मोजकीच आढळतात. "ताई, तूं फूल गडे माझे" या त्यांच्या भावपूर्ण गीतामधूनही घडते ते वत्सल प्रौढ मनाचेच दर्शन. मात्र "बाहुल्यांचे वैद्यराज", "माझी नवलाची बाहुली," "बाहुलीची सहल" इत्यादी बाहुल्यांच्या गाण्यांतून बालमनाचे नाजूक पापुद्रे हलक्या हातांनी उकलण्याचा प्रयत्न टिळकांनी केला आहे. एका बालिकेच्या निरागस मनोवत्तीचे प्रतिबिंबही त्यात पडले आहे. टिळकांनी अगदी लहान मुलांकरिता, त्यांच्याच बोबड्या भाषेत काही बोबडगीतेही लिहिली आहेत. आणि त्यातून बालकांची नादमधुर बडबड, त्यांना आवडणाऱ्या पाळीव प्राण्यांशी-पक्ष्यांशी होणारी त्यांची गोड किलबिल यांची सरस शब्दचित्रे त्यांनी रेखाटली आहेत. 'हूं हूं हूं", "चिवु चिवु चिवु" इ. गीते या दृष्टीने पाहाण्यासारखी आहेत. आणि तरीही ही शिशुगीते लिहिताना टिळकांची वृत्ती "प्रौढत्वी निज शैशवास" जपणाऱ्या कवीपेक्षा तत्त्वचिंतकाचीच अधिक होती हे जाणवत राहाते. या संदर्भात बालकवींचाही उल्लेख करावयास हवा. बालकवींच्या बालसुलभ निरागसतेला शैशव तसे

कधीच पुरते दुरावले नव्हते. म्हणूनच की काय, " चिमणीचा घरटा चोरीस गेला ", " रागोबा आला ", " माझा भाऊ " या बालकवींच्या नाट्यपूर्ण आणि खेळकर बालगीतांमधून बालमनाचेच प्रसन्न दर्शन घडते. याच काळात कविवर्य भा. रा. तांबे यांनीही बालबालिकांच्या मनोवृत्तीतील अनेक हृद्य छटा दर्शविणारी काही बालगीते लिहिलेली आढळतात. " तर मग गट्टी कोणाशी ? " हे त्यांचे सुरेख नाट्यगीत तर आजही लोकप्रिय आहेच, पण त्याशिवाय " हे कोण गे आई " किंवा " चिव चिव चिमणी छतात " ही त्यांची बालगीतेही बालकांच्या कुतुहलाचाच आविष्कार बालभाषेतून करणारी असल्याने विशेष आकर्षक वठली आहेत.

बालगीतांच्या या दालनात दत्तांचे वैशिष्ट्य आजही एकमुखाने मानले जाते. बालांवर लिहिलेली, बालांसाठी लिहिलेली आणि बालांच्याच मुखातून यावीत अशी, असे हे बालगीतांचे तिन्ही प्रकार दत्तांच्या मोजक्याच बालगीतांमध्ये अशा काही लोभस आणि वेधक स्वरूपात भेटतात की, त्यांचा विसर सहसा पडू नये. बालकांच्या मनोभूमिकेशी अशी समरसता साधून लिहिलेली ही सहजसुंदर लाघवी, नाट्यपूर्ण बालगीते प्रौढ मनालाही ओढ लावतात आणि शैशवाचे गोजिरवाणे भावविश्व मूर्तिमंत साकार करतात. " शहाणी बाहुली " " अ आ ई " किंवा " बोलत का नाही " या तिन्ही कविता बालकांच्या मुखातून याव्यात इतक्या अकृत्रिम आणि बोलक्या आहेत. या बालगीतांतील भाषेकडे विशेष आवर्जून पाहिले तर दिसेल की, बालभाषेशी ती किती सहजशीलेने व पूर्णत्वाने एकरूप झाली आहे! नव्हे, ती बालकांचीच भाषा आहे, त्या भाषेचे केवळ उपरे अनुकरण खासच नव्हे. " डोळे फिर्विते, टुलुटुलु कशी माझी सोनी बघते ' किंवा " मला वाटते, इला बाई, सारे काही, सारे कळते " या तालबद्ध ओळींतील सहजमाधुर्य " फिरविते " या नेहमीच्या क्रियापदाचे " फिर्विते " हे गिरकीदार फिरकीदार रूप, " टुलटुल, " " टुटुलुटु " या ध्वन्यर्थक शब्दांतला अंगभूत गोडवा आणि " सारे काही सारे कळते " इथे केवळ साध्या शब्दांच्या द्विरुक्तीमधून साधलेली भावच्छटा आपल्याही मनामध्ये रुणझुणत राहाते. " ताई गुणाची माझी छकुली, झोका दे दादा म्हणू लागली " या लडिवाळ ओळींनी आरंभ होणारी " आंदोलन " ही कविता पाहा,- पाठच्या भावंडांमधले मधुर वात्सल्य, त्यांचीच नैसर्गिक कल्पकता, आणि लयबद्धतेचे अवीट माधुर्य या सर्वांचाच संगम या प्रेमळ गीतात झाला आहे.

**" ताई गुणाची माझी छकुली, झोका दे दादा म्हणू लागली**
**वायुसिंधूला भरती आली, नौका हालते वरतीखाली**
**पर्कर शिडांची त्रेधा उडाली, शाबास ताई माझी सोनुली—**
**जो जो गं जो जो "**

या कल्पक चित्राला छोट्या भावाच्या स्निग्ध वत्सलतेची कौतुकाची सुंदर किनार आहे. " परकर " या शब्दाच्या, कवितेतील " पर्कर " या उच्चारानेही या गीताची

खुमारी वाढली आहे. ते बालमनाला अधिक जवळचे झाले आहे. " मोत्या, शीक रे अ आ ई " या सुरेख गीतातही बालमनाच्या निर्व्याजतेबरोबरच " शीक रे " या लाघवी शब्दातील लडिवाळ आग्रहामुळे एक वेगळाच गोडवा आला आहे. दत्तांच्या या साऱ्याच बालगीतांमध्ये जसा एक नैसर्गिक आणि निरागस बालभाव भरून राहिला आहे तशीच त्यांतील स्वाभाविक नाट्यगुणांमुळे ही बालगीते म्हणजे सुंदर अभिनयगीतेच झाली आहेत. " बोलत का नाही, झाले काय तुला बाई " या नादमधुर गीतात—

**" शेजारिण वेणुचा बाहुला, नवरा तुजला आज पाहिला**
**म्हणुनि लाजुनि धरिशि अबोला, ओळखले बाई, नको तू सांगू**
**नको काही ! "**

यातील नर्म विनोदामुळे जशी वेगळीच लज्जत आली आहे, तसेच बाल-विवाहाच्या त्या काळातील निरागस किशोरीचेही ते एक भावमधुर चित्र झाले आहे. आपल्या शहाण्या बाहुलीचे कौतुक गातानाही " सदा खेळते, कधि हट्ट धरून न मागे भलते, शहाणी कशी, साडीचोळी नवि ठेवि जशिच्या तशी " या लडिवाळ उद्‌गारांतून या किशोरीने नकळता, जणु स्वतःचीच प्रतिमा रेखाटली आहे ! " सायंकाल " हे दत्तांचे अंगाईगीत आहे. ते बालगीत नसले तरी आकाशाच्या अंगणात रांगता रांगता शिणलेल्या तान्हुल्याचे हे वत्सल रूपक किती हळुवार, हृदयंगम तसेच नावीन्यपूर्ण आहे !

**" बाई ग माझे बाळ गुणाचे, रांगत होते तरी केव्हाचे,**
**लाल दीसती डोळे झोपेचे, नीज रे बाळा नीज सुखाचे "**

या वत्सल ओळींमध्ये आईच्या ममतेचे कसे नाजूक, हळुवार प्रतिबिंब उमटले आहे ! ' लाल दीसती ' या ओळीतील ' दीसती ' हे दीर्घ रूपही शुद्धाशुद्धतेचा विचार मनातून सहजगत्याच बाजूला होऊन स्वाभाविक आणि लडिवाळ वाटू लागते. मूळच्या ऱ्हस्व शब्दाची ही दीर्घता सतत काळजी वाहणाऱ्या आईच्या मायेचीच अतूट साखळी नकळता सुचवते आहे ! नेहमीच्या प्रौढांच्या भाषेतील शुद्धलेखन बालभाषेत येऊन कसे चालेल ? या बालगीतांतील शुद्धलेखन, त्यातील विरामचिन्हे, त्याची रूपे, त्यातील द्विरुक्ती हे सरळ सरळ बालभाषेतूनच आले आहे; आणि दत्तांचा बालमनाचा समज किती परिपूर्ण होता याचीच साक्ष देत आहे. कवीचे मन बालमनात कसे व किती प्रवेश करू शकते, त्याच्या कल्पनेशी, विश्वाशी कसे समरस होते यावरच बालगीतांचे यश अवलंबून असते. लहान मुलाच्या मनाला जे भावते, भिडते, जवळचे, जिव्हाळ्याचे वाटते तेच दत्तांच्या या बालगीतांत उतरले आहे, आणि दत्तांच्या या शिशुगीतांमधील भाषा हीच खरी बालभाषा आहे. ती वेगळी असणार नाही, असून चालणार नाही याची अंगभूत जाण कवीला आहे. बालकांचे आवडते विषय कोणते, त्यांच्या कल्पना

बालसृष्टीमधून कशा सहजगत्या येतात, त्यांचे कुतूहल कसे व कशामुळे जागे होते, आणि प्रौढांचे अनुकरण ती कशी नकळताच करतात या सर्वांची प्रचीती दत्तांच्या या शिशुगीतांमधून उत्कटपणे येते.

“ रात्रीच्या मांडीवरि झोपाया, केंव्हाच गेला दिवसराया ।
जागुनि जागुनि तापली काया । नीज रे बाळा नीज सखया ”

या ओळी पाहा, दत्तांच्या भाषेचे एरवीचे संस्कृतप्रचुर सौष्ठव आणि सुश्लिष्ट प्रौढ रूप इथे नितांत साधेपणात व सहजसौंदर्यात कसे अंतर्बाह्य न्हाऊन निघाले आहे.

आरंभीच उल्लेखिल्याप्रमाणे कवी दत्तांची ही बालगीते तशी मोजकीच असली तरी त्या प्रत्येकाचे काही स्वतंत्र आणि मनोवेधक वैशिष्ट्य आहे म्हणूनच त्यांच्याकडे अधिक जवळून निरखून पाहावयास हवे. “ अ आ ई ” या कवितेतील लहानगी बालिका आपल्या लाडक्या दोस्ताला, मोत्या कुत्र्याला, “ अ आ ई ” शिकण्याचा प्रेमळ, लडिवाळ आग्रह करते आहे. या कवितेची ही मूळ कल्पनाच किती स्वाभाविक आणि बालमनाशी जिव्हाळ्याने निगडित झालेली आहे ! “ दादा आई म्हणताती, अ आ ई कठिण किती, तुजला कधी न येईल ती ! ” हे तिचे उद्‌गार मोत्याला उद्देशून काढले असले तरी त्यामध्ये तिच्या चिमुकल्या मनाचीच अनुभूती व खंत कशी निरागस रूपात प्रतिबिंबित झाली आहे ! कदाचित मोठ्या भावंडांना शिकताना पाहून, या छोट्या बालिकेनेही स्वतः शिकण्याचा आग्रह धरला असेल आणि तिच्या आई-दादांनी तिला हेच ऐकवले असेल ! बालमनामध्ये दत्त किती अलवार पावलांनी शिरत याचीच साक्ष ही छोटी कविता देत नाही काय ? मोत्या अ आ ई शिकला तर त्यामध्ये तिच्या स्वतःच्याच नाराज मनाचे जणू समाधान होणार आहे. म्हणूनच “ शीक रे अ आ ई ” हा लडिवाळ आग्रह ! “ शहाणी बाहुली ” हे दत्तांचे नमुनेदार बालगीत, शिशुकाव्यांच्या आजच्या समृद्ध जमान्यातही किती वैशिष्ट्यपूर्ण वाटते पाहा ! या मधुर गीताची चाल, त्याची गेयता, त्याची शब्दरूपे, आणि त्यातील लडिवाळ निरीक्षण सारेच सरळ सरळ एका निरागस बालिकेच्या मनातून नेमके अवतरले आहे ! या गोड बालगीतातील ही छोकरी स्वतःला आपल्याच आईच्या रूपात पाहाते आहे आणि त्याच भूमिकेतून आपल्या बाहुलीचे परोपरीचे कौतुक मोठ्या तन्मयतेने गाते आहे ! आपल्या आईने केलेले आपलेच कौतुक आणि क्वचितप्रसंगी केलेली कानउघाडणी, दोहोंचा मोठा मजेशीर मिलाफ तिच्या व बाहुलीच्या या गोजिरवाण्या नात्यात झाला आहे ! “ सदा खेळते, कधि हट्ट धरून न मागे भलते, शाहाणि कशी, साडिचोळी नवि ठेवि जशिच्या तशी ” या ओळींमध्ये घडणारे हे बालमनाचे दर्शन किती सूचक व मार्मिक आहे ! गुलगुलु, दुलुदुलु इ. ध्वन्यर्थक शब्दांनी या गीताची लज्जत किती तरी वाढली आहे. ‘ बोलत कां नाही ? ’ हे दत्तचें दुसरे भावमधुर गीत ! एका अल्लड बालिकेच्या अंतर्मनात आणि भावविश्वात कवीने अलगद प्रवेश करून जी समरता इथे साधली आहे त्यामुळेच हे नादमधुर गीतही मोठे

वेधक आणि हृद्‌गम वटले आहे; या गीताचे खरे वैशिष्ट्य त्याच्या उत्स्फूर्ततेमध्ये जसे आहे, तसेच ते एका निरागस बालिकेच्या मनोविश्वाचे अत्यंत नितळ व सहजसुंदर प्रतिबिंब म्हणूनही आहे. आपल्या लाडक्या बाहुलीची परोपरीने मनधरणी करणारी ही बालिका साकार करताना या साऱ्याच कवितेने कसे लडिवाळ, लाघवी रूप धारण केले आहे ते पाहाण्यासारखे आहे. ' बोलत कां नाही, झाले काय तुला बाई ! ' या, या गीताच्या पालुपदापासूनच हा लाघवी सूर या कवितेत भरून राहिला आहे आणि एका चिमुकल्या बालमनाची काळजी, साशंकताही त्यात अलगद मिसळली आहे. या मोहक गीतामध्ये ही बालिका स्वतःच्या आवडीनिवडींचे, भावभावनांचे, चिमुकल्या सुखदुःखांचे, फार काय स्वतःचेच रूप स्वतःच्या बाहुलीमध्ये पाहाते आहे !

' आई तुजला रागे भरली
कीं दादाने खोडी केली
रुसली माझी बाळ सोनुली
काय करूं बाई, गडे तूं बोलत कां नाही ? '

या ओळींमधून या अजाण बालिकेच्या अंतर्मनात वास करणाऱ्या वत्सलतेची येणारी प्रचीतीही मोठी हृदयस्पर्शी आहे ! आणि यापूर्वीच म्हटल्याप्रमाणे उण्यापुऱ्या ७–८ दशकांपूर्वीच्या बालविवाहाच्या त्या काळातील एका बालिकेचे हे मोठे स्वाभाविक आणि मनोरम चित्र आहे ! परचित्तप्रवेशाची, समरसतेची आणि स्वतःच्या किंवा इतरांच्याही भावानुभवाशी एकरूप होण्याची किमया दत्तांना अशी प्रकर्षाने साधली होती, म्हणूनच, संसृतीचा असह्य भार वाहणाऱ्या वत्सल पण असहाय स्त्रीमनाचा आणि मातृहृदयाचा ते जसा अचूक टाव घेऊ शकले, त्याच तन्मयतेने या सर्व बालगीतांमधून एका अजाण किशोरीच्या चिमुकल्या भावविश्वातही ते हलक्या पावलांनी अलगद उतरू शकले आहेत.

दत्तांच्या या बालगीतांच्या किंवा वत्सल अंगाई गीतांच्या पाठीशी रे. टिळकांची प्रेरणा असेल काय हा विचार येथे साहजिकच मनात येतो. १८९४–९५ या काळात नगरला असतानाच रे. टिळकांचा व दत्तांचा परिचय झाला. श्रेष्ठ कवी या नात्याने टिळकांचा नावलौकिक त्या वेळीही सर्वत्र झाला होता. टिळकांच्या प्रेमळ आणि स्फूर्तिप्रद साहचर्यामुळे दत्तांची काव्यदृष्टी आणि अंतर्विश्वही अधिक व्यापक झाले. टिळक हे केवळ फुलामुलांचे कवी नव्हते किंवा केवळ तत्त्वचिंतकही नव्हते. "परंतु तेणे प्रीतिकरांची प्रीती सरली नाही " असे व्यवहारी जगालाही मुक्त कंठाने सांगणारा, वत्सलतेचा, प्रीतीचा एक जिवंत झरा त्यांच्या अंतःकरणात सतत झुळझुळत होता. टिळकांच्या प्रेरणेनेच कदाचित दत्तांनी लहान मुलांमुलींसंबंधीची आपली गीते लिहिण्यास आरंभ केला असावा. ' बालबोध मेवा ' या प्रामुख्याने लहान मुलांसाठी काढलेल्या खिस्ती मासिकाशी टिळकांचा

जिव्हाळ्याचा संबंध होता. दत्तांच्या कविता आणि बालगीते या मासिकात प्रसिद्ध होऊ लागली तीही टिळकांच्याच आग्रहाने. ' ताई गुणाची माझी छकुली ' ही दत्तांची कविता खिस्ती समाजातही इतकी लोकप्रिय झाली होती की, घराघरातून तिची पारायणे त्या काळातही होत असत. दुसऱ्याही एका गोष्टीचे स्मरण इथं झाल्याखेरीज राहात नाही. दत्तांना बंगाली भाषा बऱ्यापैकी अवगत होती. कलकत्ता विद्यापीठाच्या अधिकारक्षेत्रात असलेल्या इंदूरच्या मिशन कॉलेजमधूनच ते पदवी परीक्षा उत्तीर्ण झाले होते. या विद्यापीठाच्या क्रमिक पुस्तकांमध्येही त्या वेळी बंगाली भाषेचा अंतर्भाव साहजिकच होत असे हे विसरता येणार नाही. ' दत्त ' हे काव्यातील आपले टोपण नाव घेतानाही दत्तांना मायकेल मधुसूदन दत्तांसारख्या बंगाली कवीपासून स्फूर्ती मिळाली असणेही अगदी शक्य आहे. बंगाली वाङ्मय शिशुगीतांच्या दृष्टीने त्या काळातही मोठे समृद्ध होते. कदाचित दत्तांच्या या प्रेरणेचा उगम काही अंशी बंगाली काव्यातही असल्यास नवल नाही. किंबहुना ज्या प्रार्थनासमाजाचे संस्कार दत्तांच्या मनावर नवथर वयातच झाले होते त्या संस्कारांचा मूळ उगमही बंगालमध्येच होता. असो. एवढे मात्र खरे की, माधव जूलियनांनी यथार्थपणे म्हटल्याप्रमाणे " आधुनिक मराठी कवितेत वत्सलरसाचा आणि निरागस बालमनाचा हा चिमुकला निर्मळ प्रवाह आणून सोडण्याचे दत्तांचे श्रेय आणि त्यांचे वैशिष्ट्य निःसंशय मोठे आहे. " परंतु अनेकदा एखाद्या श्रेष्ठ पूर्वसूरीकडून किंवा आदरणीय समकालिनाकडून मिळालेली प्रेरणा किंवा स्फूर्ती हे कवीच्या काव्यात्म व्यक्तित्वातील नाजूक गाभा किंवा निखळ सत्त्व त्याच्या शब्दातून बाहेर प्रकट करणारे केवळ एक निमित्त असते, त्याच्या निर्मितीला, चिंतनाला चालना देणाऱ्या गतिवाहकासारखे असते. जे असते ते कवीच्या अंतरंगात, त्याच्या सच्च्या व्यक्तिमत्त्वातच असते, आणि असे असणेच खरे महत्त्वाचे असते. आपल्या चित्ताच्या कोवळ्या हिरव्यागार भूमीत अंकुरलेल्या भावनेशी, अनुभवाशी एकरूप होण्याची शक्ती दत्तांच्या तरुण मनात मूलतःच होती. कदाचित ज्या निरागस बालसुलभतेने बालकवींनी निसर्गालाही सतत बालरूपातच पाहिले त्याच वृत्तीने दत्तांनीही बालमनाशी ही समरसता साधली असावी. बालगीतांकडे दत्तांच्या मनाचा हा कल कशामुळे असा झुकला असेल ? इतकी सहज अकृत्रिमता त्यात कशी आली असेल असा विचार करताना असेही मनात येते की दत्तांना आपल्या वयाची पंचविशीही पहाता आली नव्हती, कदाचित निष्पाप शैशवाला बिलगलेला एक कोपरा त्यांच्या अंतःकरणात कुठे तरी लपलेला असेलही आणि मग असेही जाणवते की, दत्तांच्या काळातील त्या पिढीला कधी लहान राहाताच आले नाही. त्यांचे खांदे फार लवकर भारावले, त्यांना फार लवकर मोठे व्हावे लागले ! स्वतःला पितृपद आले आणि स्वाभाविक वात्सल्याचे झरे हृदयात झुळझुळले तरी पुरत्या न अनुभवलेल्या शैशवाची स्वप्नचित्रे त्यांच्या डोळ्यांपुढून कदाचित पुरती पुसलीही नसतील... म्हणूनच की काय आपल्या या मोजक्याच शिशुगीतांमधून दत्तांचे मन, त्यांची वाणी जितकी मोकळी होते, अल्लाद बालमनात शिरते, सारी आवरणे टाकून

स्वतःच्या नैसर्गिक नितळ रूपात रुणझुणताना दिसते तशी ती, त्यांच्या काही भावकवितांचा अपवाद सोडल्यास, इतर काव्यातून क्वचितच दिसेल.

दत्तांचे व्यक्तिमत्त्व हे जातिवंत कलावंताचे, सौंदर्यासक्त, उत्कट कवीचे व्यक्तिमत्त्व होते. जीवनातील सर्वच सुंदर गोष्टींविषयी त्यांना जशी आंतरिक आसक्ती होती, तशीच जीवनाच्या अनेक अंगोपांगांना सारख्याच उत्कटपणे आणि परिपूर्णतेने भिडण्याची त्यांची अंगभूत प्रवृत्ती होती. ही प्रवृत्ती कविता, सतारवादन, नखचित्रकला यांसारख्या कलांना, सौंदर्यरूपांना जवळ करण्याच्या त्यांच्या आवडीमधून परोपरीने व्यक्त झाली, आणि तिच्यामुळेच त्यांना आपल्या काव्यामधून स्त्रीमनाला व बालमनालाही असे तन्मयतेने भिडता आले. या तन्मयतेचा व एकरूपतेचा नितळ परिपाक म्हणजेच दत्तांची ही सहजमधुर शिशुगीते होत!

# राष्ट्रीय आणि सामाजिक कविता



कवी दत्तांच्या वैयक्तिक जीवनाला आणि भावजीवी व्यक्तिमत्त्वाला सामाजिक आयुष्याचेही एक अंग होतेच आणि त्यांची सामाजिक व राष्ट्रीय कविता त्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या या अंगाशीच निगडित झाली आहे. घरी व दारी लाभलेल्या प्रार्थनासमाजाच्या आणि ख्रिस्ती धर्मातील मानवतावादाच्या संस्कारांना जसे दत्तांच्या जीवनात जिव्हाळ्याचे स्थान होते, तसेच ते त्या काळातील सामाजिक चळवळींनाही होते. १८९४–९५ चा तो काळच असा सामाजिक व राष्ट्रीय प्रबोधनाचा होता की, दत्तांसारख्या तरुण, उत्कट कविमनालाही केवळ कवितेमध्येच समाधान लाभू नये! भारतीय असंतोषाचे जनक गणल्या गेलेल्या लोकमान्य टिळकांच्या प्रेरणेने पुण्याहून नवजीवनाचा व चैतन्यमय सामाजिक आंदोलनाचा एक तेजस्वी प्रवाह सुरू झाला होता आणि महाराष्ट्रभर त्याला मोठ्या उत्साहाने प्रतिसाद मिळत होता. सामाजिक व राष्ट्रीय जीवनाची ज्योत जागती ठेवणारे गणेशोत्सव व शिवाजी उत्सवासारखे उपक्रम एकामागून एक अस्तित्वात आले. सार्वजनिक सभेसारख्या संस्था निर्माण झाल्या आणि साऱ्या महाराष्ट्राचे मरगळलेले मन त्यामुळे प्रभावित झाले, उत्तेजित झाले. महाराष्ट्रात प्रथम पुण्यामध्ये निर्माण झालेल्या या प्रेरणेने नगरलाही जी मंडळी कार्यप्रवण झाली, त्यांत दत्तांचाही अंतर्भाव होता. आपल्या मातृभूमीच्या शोचनीय अवस्थेमुळे, तिच्या पारतंत्र्यामुळे आणि उज्ज्वल गतकाळाच्या आठवणीने त्यांच्या मनात आधीच विषाद दाटलेला होता. 'आम्हा डोळे नसति बघण्या पारतंत्र्यामुळे हो। ऐकायाला श्रुतिहि नसति पारतंत्र्यामुळे हो।' ही पारतंत्र्याची उत्कट व्यथा जेव्हा केशवसुतांच्या कवितेतून व्यक्त होत होती आणि राष्ट्रीय कवी विनायकही गतेतिहासाकडे डोळे लावून आपल्या परतंत्र मातेचे वर्तमानातील दुर्दैवी चित्र 'हतभागिनी'सारख्या कवितेतून उभे करीत होते, त्याच काळात दत्तांनीही परवशतेच्या दुःखाची व्याकुळ गीते गाइली होती. 'स्वतंत्रतेस', 'भगवा झेंडा', 'मावळ्यांस आमंत्रण', 'श्री शिवछत्रपती' या दत्तांच्या राष्ट्रीय कवितांच्या

शीर्षकांवरूनही त्या कवितांतील आशयाची कल्पना सहज येऊ शकेल. वीररसापेक्षा करुणारस त्यांच्या प्रकृतीस अधिक जवळचा, साहजिकच पूर्वेतिहासातील शौर्यगाथेपेक्षाही पारतंत्र्याची आर्त व्यथाच त्यांच्या शब्दांतून उमटली यात आश्चर्य नाही. ' मनोरंजन ' मासिकाने दिवाळीकरिता त्यांच्या कवितेला बोलाविले असता दत्त तिला म्हणतात " तू जा बापडी ! भावाबरोबर सण साजरा कर– मला, मला सण कसचा ? "

**' वसे भीषण अंधार जरि मनांत,**
**काय दीपा लावुनी मग जनात ?**
**देश बुडला दुःखात आपुला गे,**
**कसा उत्सव मग गोड मना लागे ?**
**जधी होइल जन्मभू पुण्यशाली**
**तदा माझी समज गे दिवाळी '**

– या शब्दांतून त्यांचे विव्हल मनच व्यक्त होत नाही काय ? ' सुंदर विहंग ' हातात पकडला असता, त्याला ते ' तुला सुंदर पिंजरा आणीन, गोडगोड खाण्यास देईन ' म्हणून प्रसन्न करू पाहतात, पण तो पक्षी मात्र दीनवाणा झालेला पाहताच, तत्काळ त्याला मुक्त करताना म्हणतात,

**' जा बाबा ! पारतंत्र्याचें दुःख मला ठावें**
**मीच तुजला पंजरीं कसे न्यावें ? '**

वर्षप्रतिपदेला त्यांना शककर्त्या राजा विक्रमाची आठवण होते आणि त्याला उद्देशून ते म्हणतात, ' राग सोड विक्रमा । येई रे डोळे का मिटले । हतभागी तव देश बुडाला हाय ! कसे झाले ! येशिल जेव्हा देशरक्षणा तोच सुदिन मजला ! तीच खरी प्रतिपदा । तोच सण सुवर्ण भूमीला...... '

' श्रीशिवछत्रपती ' या आपल्या ओजस्वी कवितेमध्ये ते शिवरायाची तुलना नरसिंहावताराशी करतात. पारतंत्र्यात, परक्या राजकर्त्यांना अप्रिय आणि आक्षेपार्ह वाटेल असे काही स्पष्टपणे, प्रत्यक्षपणे लिहिणे शक्य नव्हते. म्हणूनच भूतकाळामध्ये शिरून जुन्या इतिहासाच्या पडद्याआडून वर्तमानकाळाचे चित्र रेखाटले जाई, आदेश, संदेश दिले जात. शि. म. परांजप्यांसारख्या कल्पक लेखकाच्या वक्रोक्तिपूर्ण, व्याजोक्तिपूर्ण लेखनाचा जन्म याच परिस्थितीपोटी झाला होता. ' भगवा झेंडा ' ही कविता लिहिताना दत्त कवितेतील भावाशयाशी इतके तद्रूप झाले की, " बाजीरावही ' विप्र ', क्षत्रिय परी झाला जयाच्या बळे । हा ! हा ! क्षत्रिय मी असून असु हे त्यावीण का ठेविले ? " असे आत्मनिर्भर्त्सनेचे तीव्र उद्गार त्यांच्या वाणीतून उमटले.

दत्तांच्या या राष्ट्रीय स्वरूपाच्या देशभक्तीपर कवितांमध्ये त्यांच्या व्याकुळ अंतरीचा विषाद आणि तळमळ व्यक्त होते, यात शंकाच नाही. ही तळमळ आणि हे दुःख निःसंशय प्रामाणिक होते; सभोवतीच्या परिस्थितीने व्यथित झालेल्या एका संवेदनाशील मनात त्याचा जन्म झाला होता. विनायक, केशवसुत, टिळक यांच्यासारख्या समकालिनांच्या कवितेतही तेच सूर उमटत होते. परंतु दत्तांची प्रकृती मूलतःच वेगळी होती. ती उत्कट आणि सौंदर्यासक्त भावकवीची होती, भावजीवी कलावंताची होती, निसर्गात आणि प्रणयात बेहोषपणे रमणारी होती. त्यांच्या अंतःकरणाला कारुण्याचाच स्पर्श अधिक सहजपणे होत असे. म्हणूनच अर्वाचीन मराठी कवितेचे जनक अशा केशवसुतांच्या राष्ट्रीय व सामाजिक स्वरूपाच्या कवितांतील ओजस्विता, आवेश व प्रक्षोभच नव्हे तर, ' आम्हाला डोळे नसती बघण्या पारतंत्र्यामुळे हो ' यासारख्या त्यांच्या साध्या पण सच्च्या उद्‌गारांतील उत्स्फूर्तता व उत्कट आर्तता दत्तांच्या कवितेत नेहमीच आढळत नाही. दत्तांच्या राष्ट्रीय कवितेत आत्मनिर्भत्सना आहे, विषाद आहे, गतकालाचे स्मृतिचिंतन आहे. पण भावनांचा उद्रेक नाही. खडबडून जागे करणारा प्रक्षोभ नाही. वर्तमानकाळातून भविष्याचा वेध घेणारी द्रष्ट्या कवीची दूरदृष्टी नाही, आणि अस्पृश्यता किंवा विषमतेसारख्या अनिष्ट रूढींवर केलेले प्रहारही नाहीत. सामान्यतः कलावंताच्या संवेदनाशील कोमल हृदयाला अटीतटीच्या परिस्थितीत, इतर उत्कट भावनांप्रमाणेच देशभक्तीचाही स्पर्श स्वाभाविकपणेच होतो. कोवळ्या तारुण्यात तो तीव्रतर होतो. आणि सभोवतीची परिस्थिती प्रतिकूल व विपरीत असली की, त्याची धग तात्कालिक स्वरूपात का होईना, पण निश्चितपणे वृद्धिंगत होते. परंतु त्या कवीचे खरे हृद्‌गत, त्यांचे आंतरिक व्यक्तिमत्त्व, त्याचा सच्चा आविष्कार अशा कवितांतून होतोच असे नाही. दत्तांच्या राष्ट्रीय कवितांची ही स्वाभाविक मर्यादाही दृष्टिआड करता येणार नाही.

या सर्व कवितांत त्यांची ' स्वतंत्रतेस ' ही कविता जशी भावपूर्ण तशीच विचारमय आहे. माणसांचे अनिर्बंध मन हेच स्वतंत्रतादेवीचे खरे मंदिर आहे. त्या मनाला कुणी बेड्या ठोकू शकत नाही की, बंदिवासात डांबू शकत नाही हे विचार निःसंशय उदात्त व स्फूर्तिप्रद आहेत. या कवितेच्या शेवटच्या दोन ओळींत दत्तांनी इंग्लंडमध्ये स्वतंत्रतेचे पवाडे गाणाऱ्या परंतु भारतात मात्र तिला दडपून टाकणाऱ्या दुष्ट व आपमतलबी ब्रिटिश राजनीतीचा संतप्त शब्दांत धिक्कार केला आहे.

**" ज्यांना त्वद्‌गुण ठाऊके, निजगृहीं त्वद्‌भक्त जे गाजती**
**येथें तेच तुझ्या वधार्थ उठती ही नीति गे कोणती ? "**

हे उद्‌गार किती भेदक आणि मर्मस्पर्शी आहेत ! ते वाचताना खाली लिहिलेल्या कुसुमाग्रजांच्या ' जालियनवाला बाग ' या ओजस्वी व भेदक कवितेतील ओळी नकळताच स्मरतात—

**" आणि आज हे तुझ्या पताका ज्यांच्या हातात**
**निःशस्त्रांच्या रक्तामांसामध्ये नाहतात !**
**मर्दांच्या बंदुका उडाल्या मुलाबायकांत**
**जगजेत्यांच्या पराक्रमाची स्फूर्तिप्रद रीत !**
**मंगल तव गीतांचा होतो मंदिरात घोष**
**दया, क्षमा अन् शांति यामध्ये वसतो परमेश ! "**

दत्तांची स्वातंत्र्यलालसा प्रामाणिक आणि उत्कट होतीच. परंतु ज्या प्रक्षुब्ध व स्वातंत्र्याकांक्षेने रसरसलेल्या कालखंडात केशवसुत, विनायकांसारख्या समकालीन कवींबरोबर ते वावरत होते, त्या काळाचाही त्यांच्या मनावर आणि काव्यावर झालेला तो अपरिहार्य आणि स्वाभाविक परिणाम होता. अर्थात केवळ कवितेच्या द्वारा व्यक्त झाल्यावर जागच्या जागी शमण्याइतका त्यांचा असंतोष क्षीण नव्हता, वांझ नव्हता. तो क्रियाशीलही होता. म्हणूनच नगरला शिवाजी उत्सव, गणपती उत्सवासारख्या उपक्रमांतही त्यांनी हिरीरिने भाग घेतला. पुण्याहून या सामाजिक चळवळींचे लोण आले आणि दत्तांनी दीर्घ प्रयत्नांनी नगरच्या तरुण पिढीत हुरूप आणला व गणपती उत्सव नगरला प्रथमच मोठया उत्साहाने साजरा केला. त्या उत्सवात नगरसारख्या लहान गावी साजऱ्या झालेल्या मेळयांची संख्याही शंभरावर होती ! या मेळयांना दत्तांनी पदे करून दिली होती. ही पदे दोन लहान पुस्तकात 'एक अहमदनगरस्थ' या सहीने त्यांनी नंतर संकलितही केली होती. ही पदे अतिशय लोकप्रिय झाली यात आश्चर्य नाही. त्या काळातही हिंदुमसलमानांमध्ये वैमनस्य असे, असंतोष असे. त्याबद्दल वाईट वाटून दत्त एका पदात म्हणतात,

**" अहो आर्यभूमीवासी । विनंति ही तुम्हासी**
**त्यागोनि मत्सरासी स्वदेशहित करा**
**उकरोनि कलह खोटा । सकलासि होय तोटा**
**अहो । हिंदुमुसलमान, तुम्ही बंधुंच्या समान**
**प्रेमे सदा वसून, वस्त्रे स्वदेशि घ्या "**

मूर्तिपूजा न मानणाऱ्या प्रार्थनासमाजाच्या एकेश्वरी पंथात वाढलेले दत्त, गणपती उत्सवात इतक्या उत्साहाने कसे सहभागी झाले ? हा प्रश्न इथे साहजिकच मनात उद्भवतो. खरे तर त्यांना या उत्सवाच्या धार्मिक बाजूशी फारसे कर्तव्य नव्हतेच. हा उत्सव म्हणजे समाजात जागृती, एकी व चैतन्य घडवून आणणारा एक महत्त्वपूर्ण व आवश्यक उपक्रम, हीच दत्तांची दृष्टी असावी. शिवाय सोज्वळ धार्मिकतेच्या पायावर आधारलेली या उत्सवांची क्रियाशील सामाजिक व राजकीय बाजूच त्या काळात महाराष्ट्रापुढे प्रामुख्याने होती. या उत्सवांना चालना देणाऱ्या लोकमान्य टिळकांची प्रेरणा व

दृष्टीही अर्थात हीच होती. यानंतर आलेला शिवाजी उत्सवही दत्तांनी नगरला अपूर्व उत्साहाने साजरा केला. अनेक वक्त्यांना पाचारण करून व्याख्यानमालाही यशस्वी केली. याप्रमाणे आपल्या परीने आणि कुवतीनुसार दत्तांनी आपल्या जन्मगावी सामाजिक चळवळीसही हातभार लावला होता. याच सुमारास ते नगरच्या 'तुकाराम' या वृत्तपत्रातून ऐतिहासिक व राजकीय लेखही लिहीत असत.

दत्तांच्या किंवा त्या काळातील जागरूक तरुण पिढीच्या या सामाजिक जाणिवेसही फार मोठी पार्श्वभूमी होती, परंपरा होती. १८७० पासूनच महाराष्ट्रात एक नवे सामाजिक, आर्थिक आणि राजकीय प्रबोधन सुरू झाले होते. किंबहुना त्याही आधी बाळशास्त्री जांभेकर, डॉ. भाऊ दाजी लाड, दादोबा पांडुरंग, डॉ. आत्माराम पांडुरंग अशा अनेक ज्ञात, अज्ञात व्यक्तींच्या कर्तृत्वाने या प्रबोधनास आरंभ झाला होता. ज्योतिबा फुल्यांचे असामान्य कर्तृत्वही या प्रबोधनाच्या पाठीशी निःसंशय ठामपणे उभे होते. ज्योतीरावांनी उणीपुरी ३०–४० वर्षे अखंड परिश्रम करून महाराष्ट्राचे रान उठवले होते, पेटवले होते, आणि १८९० सालीच महाराष्ट्राच्या समाज-जीवनातील हा तेजस्वी तारा अस्तंगत झाला होता. न्यायमूर्ती रानड्यांनीही ज्योतिरावांना सदैव उत्तेजन दिले होते, शक्य ते ते साह्यही केले होते. न्या. रानड्यांचे ज्ञान जितके विशाल तितकीच त्यांची सहानुभूतीही व्यापक होती. १८७२ साली त्यांनी व सार्वजनिक काका म्हणून महाराष्ट्रात ओळखल्या जाणाऱ्या गणेश वि. जोशी यांनी पुण्यात सार्वजनिक सभा स्थापन केली, आणि तिने करबंदीची चळवळ करून शेतकऱ्यांनाही त्यांच्या हक्कांची जाणीव करून दिली. तसेच सरकारलाही शेतकऱ्यांच्या प्रश्नांची दखल घ्यावयास भाग पाडले. १८७० च्या दशकातील काही आंदोलनांनी महाराष्ट्रात एक विचारमंथनच सुरू झाले आणि सुशिक्षित पांढरपेशांची दृष्टीही प्रथमच ग्रामीण भागाकडे वळली. या प्रबोधनसत्रात लोकमान्य टिळकांचे स्थान अर्थातच अग्रमानाचे होते. लोकजागृतीचे कार्य त्यांनी सतत असामान्य धडाडीने रोखठोक व परखड शब्दात केसरी व मराठा या आपल्या वृत्तपत्रांतून आणि इतर सक्रिय उपक्रमांतून चालविले होते. आपल्या विचारास आणि प्रचारास बळकटी येण्यासाठी, तसेच महाराष्ट्राच्या सामाजिक जीवनात चैतन्य निर्माण करण्यासाठीच टिळक महाराष्ट्राच्या भूतकाळाकडे व पौराणिक कालाकडे वळले, म्हणूनच टिळकांनी शिवजयंतीचे व गणरायाचे उत्सव हिरीरीने सुरू केले. हिंदूंच्या एकांड्या वृत्तीस सामाजिक एकोप्याचे संघटित वळण लावण्याचा उद्देशही त्याच्या पाठीशी होता. या उत्सवात मुलांचे मेळे निघत, स्वतः लोकमान्य, शि. म. परांजपे, न. चिं. केळकर यांच्यासारख्या रथी महारथींची विचारप्रवर्तक स्फूर्तिप्रद व्याख्याने होत. या अभिनव व प्रेरक उपक्रमांनी महाराष्ट्रातील जनता उत्तेजित व प्रोत्साहित झाल्यास नवल नाही. टिळकांनी सुरू केलेले हे धार्मिक आणि सांस्कृतिक वारे अवघ्या महाराष्ट्रात सर्वदूर घुमू लागले. हे लोण नगरालाही कसे पोचले व दत्तांनी त्यात कसा उत्साहाने भाग घेतला हे आपण यापूर्वीच पाहिले आहे.

या सर्व वातावरणाच्या आणि आंदोलनाच्या पाठीशी असणाऱ्या तीव्र सामाजिक जाणिवेचा आणि जागृतीचा परिणाम दत्तांच्या नवतरुण कविमनावर झाला असल्यास नवल नाही. दत्त या सामूहिक, सामाजिक, कार्यक्रमात तर सामील झालेच, तसेच १८९५ साली राष्ट्रीय सभेच्या प्रचंड मेळाव्यासही ते स्वयंसेवक म्हणून मोठ्या श्रद्धेने गेले होते. स्वयंसेवकांच्या वेषातील त्यांचे एक छायाचित्र आजही उपलब्ध आहे. दत्तांनी राष्ट्रीय सभेचा मेळावा आणि गणपती उत्सवासारख्या सार्वजनिक चळवळी यांत भेदभाव केला नाही, दोन्हीही लोकजागृतीचेच मार्ग आहेत हे जाणून आपल्या कुवतीनुसार ते त्यांत सहभागी झाले. ' मावळ्यांस आमंत्रण ' यासारख्या दत्तांच्या कवितेमागील पार्श्वभूमी आणि प्रेरणा त्या काळातील या विशिष्ट धुमसत्या परिस्थितीचे विहंगमावलोकन केल्यावर निश्चितच जाणवेल. त्या कवितेतील हे ओजस्वी उद्गार पाहा,

**' पुरे जेवणे, हातचे घास टाका**
**उठा सज्ज व्हा, दुंदुभीनाद ऐका**
**नका घालवू वेळ, होतो उशीर,**
**रणीं पाहतें शत्रुचें वाट शीर**
**चला मावळे वीर हो या घडीला**
**शिवाजी रणीं बोलवीतो तुम्हाला**

पुढे उण्यापुऱ्या २२–२३ वर्षांनंतर दत्तांचे चिरंजीव व चरित्रकार आणि प्रतिथयश साहित्यिक कै. वि. द. घाटे यांनी लिहिलेल्या ' शिवरायाचा जयजयकार ' या कवितेमध्येही जे उद्गार आढळतात ते असे,

**' तो सिंहनाद ऐका रे**
**द्वेषभाव विसरुनि जा रे**
**ऐक्यानें पुढति सरा रे**
**मग रायगडींच्या समाधिलाही समाधान होणार ! '**

दत्तांना त्यांच्या संवेदनाशील, संस्कारक्षम तारुण्यातच सभोवती जे वातावरण लाभले होते ते असे ! त्याचे संस्कार त्यांच्या मनावर आणि म्हणूनच काव्यावरही स्वाभाविकपणेच झाले. याच काळात केशवसुतांच्या ' एका भारतीयाचे उद्‌गार ', ' जयाजीराव शिंदे व तुकोजीराव होळकर ', ' दोन बाजी ' या कवितांतून त्यांच्या राष्ट्रप्रेमाच्या भावना व्यक्त झाल्या होत्या. परंतु सामाजिक जाणिवेची आणि रूढीविरुद्ध बंडखोरीची कविता केशवसुतांच्या काव्यसंभारात अधिक प्राधान्याने दिसते. ' अस्पृश्याच्या मुलाचा पहिला प्रश्न ', ' मजुरावर उपासमारीची पाळी ' किंवा ' तुतारी ', ' स्फूर्ति ' या कवितांमध्ये केशवसुतांची ही सामाजिक जाणीव मोठ्या भेदक आणि प्रखर स्वरूपात तर व्यक्त होतेच, पण विषमता, बेकारी, भांडवलशाही, अस्पृश्यता यांसारख्या आजही

पुरत्या न सुटलेल्या समस्यांचे महत्त्व केशवसुतांना जवळजवळ शतकापूर्वीच असे भेदकपणे जाणवले होते हे निःसंशय त्यांच्या द्रष्टेपणाचेच एक गमक होय. केशवसुतांनाच समकालीन असणाऱ्या रे. टिळकांचा राष्ट्राभिमान ' माझ्या जन्मभूमीचे नाव ', ' प्रियकर हिंदिस्तान ', ' का मग बोंबाबोंब ' इ. त्यांच्या कवितातून प्रकट झाला आहे. या संक्रमण काळातील राष्ट्रीय प्रवृत्तीच्या कवींमध्ये केशवसुत आणि विनायक यांच्या मालिकेत दत्तांसारख्या नवतरुण कवीचाही अंतर्भाव अवश्य करावयास हवा. त्यांच्या या स्वरूपाच्या कवितांना ज्या मर्यादा होत्या त्या जशा तत्कालीन परिस्थितीच्या तशाच कवीच्या व्यक्तिमत्त्वाच्या होत्या, आणि काव्यात्म प्रकृतीच्याही होत्या. या संवेदनाशील कविमनाने स्वतःच्या भावभावनांचे हळुवार स्पंदन जसे उत्कटपणे अनुभवले आणि शब्दांकित केले तसाच सभोवतीच्या परिस्थितीतील प्रक्षोभही त्याने अंतर्यामी तितक्याच सच्चेपणाने अनुभवला आणि आपल्या सामाजिक, राष्ट्रीय कवितांतून त्यालाच शब्दरूप दिले. सभोवतीच्या वातावरणाचा व प्रचाराचा परिणाम त्यामागे निःसंशय होताच, परंतु या कवितांच्या मुळाशी असलेली पोटतिडीक आणि कळकळही तितकीच प्रामाणिक व उत्कट होती. म्हणूनच दत्तांच्या व्यक्तिमत्त्वाचे एक अंग, पैलू त्यांच्या या कवितांतून व्यक्त होतो असा निष्कर्ष काढल्यास तो चुकीचा ठरणार नाही.

# निसर्गकविता



प्राचीन अर्वाचीन काळातील कोणत्याही प्रगत भाषेमधील कवितेकडे ओझरती नजर टाकली तरी निसर्गाच्या विविध रूपांमधून स्फुरलेली कविता प्रेमकवितेच्या खालोखाल समृद्ध दिसते. निसर्गाच्या बहुरंगी लावण्यकळेने कविमनाला नेहमीच ओढ लावली आहे; एखाद्या वेधक निसर्गरूपाची आपल्या संवेदनाशील मनावर उमटलेली प्रतिमा शब्दांतून सजीव करताना कविप्रतिभाही पल्लवित झाली आहे, आणि पंचेंद्रियांच्या तरल संवेदनाही चैतन्यमय झाल्या आहेत. प्राचीन काळापासूनच निसर्ग मराठी काव्यात परोपरीने डोकावताना दिसतो. संवेदनाशील कविमनाने स्पर्शरसरूपगंधाच्या किमयेने साक्षात् आणि प्रत्ययकारी केलेले एखादे वेधक निसर्गचित्र कधी शब्दांत उतरते, तर कधी एखाद्या विशिष्ट भावपूर्ण प्रसंगाची उत्कटता व रंगत वाढवणारी अनुरूप, नाट्यपूर्ण पार्श्वभूमी म्हणूनही निसर्ग काव्यात अवतरलेला दिसतो. कधी निसर्गचित्रण हे सांकेतिक, पारंपरिक दृष्टीमधून केवळ कल्पनाविलासासाठी किंवा अलंकरणासाठी केलेले असते, तर कधी मानवी भावनेचा प्रकर्ष साम्यविरोधामधून साधण्याचे किंवा मानवी भावस्थितीला ( mood ) अनुरूप आणि पूरक अशी वातावरणनिर्मिती साधण्याचे कार्य निसर्गाकडून घडते त्यामधूनच निसर्ग प्रतिमांचाही जन्म होतो. या व इतर अनेकविध स्वरूपांत निसर्गाचे अधिष्ठान मराठी काव्याला सतत लाभले आहे. किंबहुना सृष्टिसौंदर्य हा प्राचीन काळापासूनच कवींच्या स्फूर्तीचा मोठा विलोभनीय विषय झाला आहे. निसर्गाकडे विभूति-पूजेच्या दृष्टीने पाहणाऱ्या सनातन, भक्तिशील वृत्तीमधूनच वैदिक संस्कृत वाङ्मयातील उषा, वरुण, मरुत्, इत्यादी दैवतांची सूक्ते आणि ऋचा निर्माण झाल्या. अभिजात विदग्ध संस्कृत वाङ्मयातील मेघदूत, ऋतुसंहार यांसारख्या काव्यामधूनही निसर्गप्रेम आणि निसर्गसौंदर्य अनंत रूपांनी प्रकट झालेले आढळते. सृष्टीच्या अनेकविध रूपांमधून कितीएक आलंकारिक, कल्पनाप्रचुर संकेत व उपमाने कधी व कशी निर्माण झाली

त्याला तर गणतीच नाही ! साहजिकच हरिणाक्षी, राजीवलोचना, चंद्रानना यांनाही संस्कृत वाङ्मयात वाण राहिली नाही !

फार पूर्वीपासूनच निसर्गाचे ऐश्वर्य आणि भव्योदात्त सौंदर्य मराठी कवितेनेही आपल्या चित्रमयी, वेधक शब्दकळेतून व्यक्त केले. १२ व्या शतकापासूनच ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम इत्यादी मराठी संतकवींच्या अभंगवाणीमध्ये परमेश्वरविषयक भक्तीची नितांत उत्कटता व आर्तता उत्स्फूर्तपणे व्यक्त झाली. निसर्गाला तसे स्वतंत्र स्थान या प्राचीन संतकाव्यात साहजिकच मिळाले नाही. परंतु ज्ञानेश्वरांची ज्ञानेश्वरी ही प्राधान्याने गीताटीका असली तरी ते एक अप्रतिम काव्यशिल्पही असल्याने अनेक आध्यात्मिक किंवा पारमार्थिक अनुभवांचे व प्रमेयांचे गूढ सौंदर्य विशद करताना ज्ञानेश्वरांनी निसर्गातील अनेक प्रतिमांचीही नितांतसुंदर योजना केली. कमलपुष्पाच्या पाकळ्या दुखावू नयेत म्हणून त्यावर हलकेच पाऊल ठेवणारा भ्रमर आणि आपल्या गंधकोषात बंदिस्त झालेल्या भ्रमराच्या हालचालीने वारा नसतानाही स्वतःशी हलकेच डोलणारे कमल आपल्याला ज्ञानेश्वरीतच भेटते ! अर्थात या निसर्गप्रतिमांमध्येही मूळ संस्कृतातील कविसंकेतांचा काही अपरिहार्य भाग होता यात शंका नाही. 'धेनु वाजे घुणघुणा, वारा वाहे रुणझुणा, भवतारकु कान्हा वेगे भेटवा ना !' यासारख्या ज्ञानेश्वरांच्या आर्तमधुर विराणीमधून देवाच्या विरहव्यथेची व्याकुळता सभोवतीच्या निसर्गसान्निध्यामुळेच द्विगुणित झाली आहे. समर्थ रामदासांनी आपल्या पल्लेदार, प्रवाही व समर्थ वाणीमधून कोसळत्या धबधब्याचे, त्याचा गंभीर, धपापता नादही कानात घुमत ठेवणारे प्रभावी वर्णन केले आहे. तथापि संतकाव्यापेक्षा शाहिरी काव्य आणि पंडिती काव्य या दृष्टीने अधिक संपन्न आहे. विशेषतः शाहिरांच्या लावण्यांमधून, प्रणयी भावनेची खुलावट निसर्गातील विविध प्रतिभांनी परोपरीने केली आहे. कधी तरी अवचित येऊन भेटून जाणाऱ्या प्रियकराला उद्देशून शाहिरांची नायिका जेव्हा, "सख्या, तूं वळवाच्या मेघा" असे सार्थ, चतुर उद्‌गार काढते, तेव्हा या निसर्गप्रतिमेमधून साराच अनुभव साक्षात् जिवंत होतो, रसिकाशी बोलू लागतो ! मराठीतील पंडिती काव्यावर किंवा आख्यानक कवितेवर आरंभापासूनच संस्कृत महाकाव्यांतील संकेतांचे व आदर्शांचे दाट सावट पडले होते साहजिकच वर्णनपरतेला आणि कल्पनाचमत्कृतीला त्यात महत्त्वाचे स्थान मिळाले. सूर्योदय, सूर्यास्त, उद्यानशोभा, जलक्रीडा, वसंतवैभव इत्यादी ठरीव साचेबंद विषय आणि त्यांची प्रदीर्घ सांकेतिक वर्णने यांचे उद्दिष्टही नायक-नायिकांच्या भावनांना रंगतदार पार्श्वभूमी निर्माण करून अधिकाधिक उठाव देणे हेच होते.

निसर्गालाही सजीव अस्तित्व आणि प्राणतत्त्व आहे, ते चैतन्यमय आहे, याची जाण पंडिती युगात, संकेतांच्या व अनुकरणाच्या दडपणाखाली वावरणाऱ्या या कवींना सहसा होत नसावी ! अव्वल इंग्रजी अमदानीतील ( १८१८ ते १८७४ ) जुन्या परंपरेतील आगाशे, मोगरे, कीर्तिकर इत्यादी कवींनी संस्कृतातील या कविकल्पनांचा

आणि संकेतांचा तर स्वीकार केलाच, परंतु मानवापेक्षाही श्रेष्ठ असणारी आणि त्याला बोधप्रद व मार्गदर्शक ठरणारी एक उच्च अद्भुत शक्ती या अलौकिक स्वरूपातही त्यांनी निसर्गाला पाहिले. स्वाभाविकच उपदेशपरता आणि बोधपरता प्रबळ झाल्याने निसर्गाकडे पाहाणारी त्यांची दृष्टी केवळ सौंदर्याधिष्ठित अशी राहूच शकली नाही. याच काळातील चिंतामणीपेठकरांचे ' गंगावर्णना ' हे सृष्टिसौंदर्याच्या चित्रणास प्राधान्य देणारे अर्वाचीन मराठीतील पहिले श्रेष्ठ काव्य होय. याखेरीज संस्कृत धर्तीनुसार विविध ऋतुसौंदर्याचे वर्णन करणारी अनेक काव्ये अर्वाचीन मराठी कालखंडातही आढळतात. पुढे विष्णू मोरेश्वर महाजनी यांनी इंग्रजीतील स्फुट भावगीतांची जी मराठी रूपांतरे केली, त्यांत मात्र मानवी भावनांचा निसर्गाशी सुसंवाद साधण्याचा प्रयत्न त्यांनी केला आहे.

फार प्राचीन काळापासूनच मराठी काव्यात निसर्गवर्णनाचे असे वैपुल्य आहे. मात्र निसर्गाचे सचेतन रूप, त्याचे सर्व संकेतांपलीकडचे सजीव, स्वतंत्र अस्तित्व, आणि मानवी जीवनामधील खरेखुरे जिव्हाळ्याचे स्थान जाणून आत्मसात् करून कितीजणांनी ते आपल्या काव्यात उतरविले, या दृष्टीने या समग्र काव्याकडे मागे वळून पाहिल्यास, सांकेतिकतेचा आणि कृत्रिम कल्पनाप्राचुर्याचाच गाढ परिणाम प्राधान्याने जाणवतो. ज्या डोळ्यांवर संकेतांचे व पारंपरिक कल्पनांचे फसवे पटल नाही अशा स्वच्छ, निकोप व निखळ सौंदर्यप्रेमी डोळ्यांनी या कवींनी निसर्गाला पाहिलेच नव्हते, किंवा पाहूनही त्यांना ते दिसले नव्हते, जाणवले नव्हते असेच म्हणावे लागते. टेनिसन, वर्डस्वर्थ-सारख्या पाश्चिमात्य थोर निसर्गकवींच्या काव्याचे मनःपूर्वक परिशीलन केल्यानेही निसर्गाकडे पाहण्याची ही पारंपरिक व सांकेतिक दृष्टी पालटण्यास मदत झाली. आणि नव्या उमाळ्यांचे हे इंग्रजी काव्य वाचत असतानाच, ज्यांची मूळचीच प्रगतिशील आधुनिक मनोभूमिका काव्यामधील या नव्या स्थित्यंतरांसाठी सिद्ध व सन्मुख झाली होती, अशा केशवसुतांच्याच काव्यात या परिवर्तनाची व नवतेची पहिली चाहूल रसिकांना लागली.

कवी दत्तांच्या एकूण काव्यसंभारातच त्यांच्या निसर्गकवितेला विशेष प्राधान्य आहे, महत्त्व आहे. दत्तांची कविता जन्मली आणि रसिकांपुढे आली ती अर्वाचीन मराठी काव्याच्या उषःकालातच ! पाश्चात्त्य संस्कृतीशी आलेल्या नव्या संपर्कामुळे, आणि इंग्रजी रोमँटिक कवितेच्या वाचनामुळे या काळातील मूळच्या संवेदनक्षम कविमनांवर जे उत्कट संस्कार झाले, त्यांतूनच नव्या प्रगतिपर जीवनाचे, वाङ्मयीन प्रेरणांचे व आकांक्षांचे एक नवे क्षितिज त्यांच्या दृष्टीपुढे हळूहळू प्रकट होऊ लागले. जुन्या संकेतांचा व पारंपरिक वृत्तीचा मनावरचा पगडा अर्थातच पुरता दूर झाला नव्हता, आणि तरीही प्रतिगामी रूढी-परंपरेच्या चाकोरीत न बसणाऱ्या आधुनिक जीवनकल्पनेबरोबरच, नव्या अधिक सच्च्या काव्यरूपाची व त्याच्या विकासक्षमतेची चाहूल मात्र येऊ लागली होती. अशा या संधिकाळात ही कविमने अडखळत्या पण शोधक पावलांनी वावरत होती. रे. ना. वा. टिळक ( १८६२ ते १९१९ ), केशवसुत ( १८६६ ते १९०५ ),

चंद्रशेखर (१८७१ ते १९३७) आणि विनायक (१८७२ ते १९०९) या सर्व समकालिनांची कविता याच काळात 'मनोरंजन', 'काव्यरत्नावली', 'सुविचार-समागम' या मासिकांतून वाचकांपुढे येत होती; 'Golden Treasury' आणि One thousand one gems of poetry', हे इंग्रज व अमेरिकन कवींचे भावगीतसंग्रह यांपैकी बहुतेक सर्व कवींच्या वाचनात होते, आणि त्यांतील नव्या प्रवृत्तींची प्रसादचिन्हे त्यांच्याही कवितेत उमटू लागली होती. बर्न्स, वर्ड्‌स्वर्थ, बायरन, शेले, कीट्स, लाँगफेलो या पाश्चिमात्त्य प्रतिभावंतांची कविता इतर समकालिनांप्रमाणेच दत्तांनीही वाचली होती.

दत्त पदवीधर होतेच, परंतु केवळ महाविद्यालयीन अभ्यासक्रमात अंतर्भाव झाला होता म्हणूनच केवळ नव्हे, तर ज्या मनोभावाने कालिदास, भवभूती यांच्या काव्यनाट्याचे परिशीलन त्यांनी केले, त्याच उत्सुकतेने या पाश्चिमात्त्य कवितेचेही त्यांनी स्वागतच केले. एवढेच नव्हे, तर तिचेही जाणते किंवा अभावित संस्कार त्यांच्या व्यक्तिमत्त्वात मिसळून गेले. 'काव्यरत्नावली'कारांना आपला काव्यविषयक दृष्टिकोण कळविताना त्यांनी काढलेले उद्‌गार या दृष्टीने मननीय वाटतील. ते म्हणतात, "प्रगती आणि काळ यांच्या अनुरोधाने कवितेची सुधारणा झाली पाहिजे. पूर्वीची पौराणिक पद्धती आता आवडत नाही. मनोविकारांचे चित्रलेखन, सृष्टिसौंदर्याचे वर्णन आणि ऐतिहासिक ठळक प्रसंगांचे वर्णन, वगैरे गोष्टी अर्वाचीन काळास सिद्ध आहेत, व त्यांचा त्याने यथोचित उपयोग करून घेतला पाहिजे. कविता केवळ मनोरंजनाकरिता नसून, तिचा दुसरा महत्त्वाचा कार्यभाग आहे; एकंदर समाजास उन्नतविचार मनोरंजक रीतीने समर्पण करून त्याच्या उच्च मनोवृत्ती जागृत करणे हेच खऱ्या कवीचे कर्तव्यकर्म आहे."

(काव्यरत्नावली, वर्ष ११ वे, १८९९)

– पाऊण शतकापूर्वी दत्तांच्याच लेखणीतून उमटलेले हे उद्‌गार आज वाचताना एक संमिश्र प्रतिक्रिया जाणवते. जुन्या पौराणिक पठडीतून आणि सांकेतिक परंपरेच्या चाकोरीतून जाणाऱ्या पंडिती कवितेमध्ये आता त्यांचे नवतरुण मनही रमत नव्हते. कविता केवळ कथनपर, वर्णनपर किंवा बोधपर न राहाता "मनोविकारांचे चित्रलेखन"ही तिने अवश्यमेव करावे, अशी नवी जाण त्यांच्या ठिकाणी निर्माण झाली होती, पण तरीही भावकवितेचे आत्माविष्काराशी असलेले आंतरिक, अतूट नाते मात्र अद्याप पुरते उमगले नव्हते. कवीच्या किंवा रसिकाच्या मनोरंजनाचे हलकेफुलके साधन किंवा कल्पना-चमत्कृतीच्या कसरतीचे निमित्त एवढेच कवितेचे दुय्यम प्रयोजन यापुढे मानता कामा नये, हा समज त्यांच्या मनांत अवश्य निर्माण झाला होता, परंतु त्याचबरोबर समाजाला 'उन्नतविचार' काव्यामधून द्यावयास हवेत, या काव्यबाह्य आणि कर्तव्यप्रेरित विचाराचे दडपण मात्र मनावरून पुरते गेलेले नव्हते. दीर्घ काळापासून मनावर उमटलेल्या आणि स्थिरावलेल्या, जुन्या व नव्या काळाबरोबर आलेल्या नव्या संस्कारांच्या अशा संमिश्र

आणि क्वचित परस्परविरोधी वातावरणातच दत्तांची कविता जन्म घेत होती हे विसरता येणार नाही. अहमदनगरला संस्कारशील विद्यार्थिदशेतच अमेरिकन मिशनऱ्यांच्या हाताखाली झालेले शिक्षण आणि त्यांचा निकट सहवास यांचेही सखोल, सूक्ष्म परिणाम दत्तांच्या कोवळ्या मनावर झाले असल्यास नवल नाही. इंग्रजी वाचनाचा नाद त्यांना या नवथर वयातच लागला आणि पुढे मुंबईच्या महाविद्यालयीन आयुष्यातही हा व्यासंग उगावला नाही.

त्यांच्या पुस्तकसंग्रहात स्वतःला आवडणाऱ्या आंग्ल कवींच्या काव्यसंग्रहांच्या अनेक आवृत्त्या त्यांनी साक्षेपाने जपल्या होत्या. म्हणूनच की काय, इंग्रजी काव्यातील काही कल्पना आणि काही ओळींचे स्वैर अनुवादही त्यांच्या स्वतःच्या कवितेतही आढळतात. मुंबईला विल्सन कॉलेजात असताना काही इंग्रजी कविताही दत्तांनी लिहिल्या होत्या. या कविता इंग्रज कवी पोपच्या धर्तीवर असून Liberty, Love, A stormy day, Epitaph वगैरे विषयांवर ही रचना मुद्दाम सहेतुकपणे केलेली आहे या रचित काव्यात काव्यात्मतेचा भाग अर्थात अभावानेच असून इंग्रजीत पद्यरचना करण्याची ही एक कसरतच होती असे दिसते. इंग्रजीमध्ये काव्य करण्याइतका इंग्रजी भाषेकडे, विशेषतः काव्याकडे दत्तांचा ओढा होता, आणि भाषेचा सरावही होता हीच गोष्ट आपल्या दृष्टीने महत्त्वाची आहे. " शेले " या आपल्या आवडत्या इंग्रजी कवीवरही त्यांनी एक सुंदर इंग्रजी कविता लिहिली होती. ( ही आज दुर्दैवाने उपलब्ध नाही. ) त्याच काळातील इतर समकालिनांनीही अनेक इंग्रजी कवितांचे स्वैर अनुवाद केलेले आढळतात. उदा० केशवसुतांनी आठ-दहा तरी इंग्रजी कवितांची सरळसरळ भाषांतरे केलेली दिसतात. इंग्रजी कवींत शेक्सपिअर्, ड्रमंड, ड्रायडन, स्कॉट, एलिझबेथ, ब्राउनिंग इत्यादी आणि अमेरिकन कवींपैकी पो, लॉंगफेलो, इमर्सन यांच्या कविता त्यांनी भाषांतरासाठी निवडल्या आहेत. अनुवादाच्या व भाषेच्याही दृष्टीने आरंभी त्यांच्या काव्यावर संस्कृतची छाप असली, तरी पुढे इंग्रजीचाच प्रभाव अधिक बलवत्तर झालेला दिसतो. भावगीत ( Lyrlic ) हेच कवितेचे खरे रूप आहे ही जाण केवळ इंग्रजी काव्याच्या अनुकरणामधूनच नव्हे, तर अंतर्यामीच निर्माण झाल्याने, या कवींचीही काव्यनिर्मिती भावकवितेच्या स्वरूपात होऊ लागली आणि प्राचीन काव्यास सर्वथैव अनोखा असलेला आत्मविष्कारही त्यातून अपरिहार्यपणे होऊ लागला. नव्या जाणिवेचे हे वारे त्या काळातील निसर्गकवितेतही खेळू लागले. शेलेचा ' Skylark ' या कविमनांच्या अंतराळातही भराऱ्या मारू लागला आणि कीट्सच्या ' Nightingale ' चे आर्तमधुर बोल त्यांच्याही अंतःकरणात उमटू लागले. निसर्ग हा सचेतन असून मानवापेक्षाही श्रेष्ठ व परिपूर्ण आहे या नव्या जाणिवेचे पडसाद पुढील पिढीतील कवींच्या काव्यातूनही स्वाभाविकपणेच उमटत राहिले. दत्तांच्या पुढील पिढीतील बालकवींची निसर्गरूपाशी झालेली आत्यंतिक एकरूपता आणि निसर्गाच्या दर्पणात त्यांनी पाहिलेले स्वतःच्याच अंतरंगाचे प्रतिबिंब यांचे स्मरण इथे झाल्यावाचून कसे राहील ?

दत्त केशवसुतांपेक्षा वयाने कनिष्ठ असले तरी दोघे एकाच पिढीतील होते. आणि मासिक ' मनोरंजना 'मध्ये या उभयतांच्या कविता एकाच काळात प्रसिद्ध झालेल्याही आढळतात. तथापि केशसुतांचे कोणतेच जाणीवपूर्वक संस्कार दत्तांच्या कविमनावर उमटले नव्हते. समकालिनांपैकी टिळकांनी व पुढे गडकऱ्यांनीही केशवसुतांविषयी त्यांच्या मरणोत्तरही जे गौरवपर आणि स्नेहाळ उद्‌गार काढलेले आढळतात तसे ते दत्तांच्या कवितेत दिसत नाहीत. याचे एक महत्त्वाचे कारण असे की, दत्तांच्या काळात म्हणजेच एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीपूर्वी केशवसुतांच्या श्रेष्ठत्वाची किंवा त्यांच्या सांप्रदायाची प्रत्यक्ष, भावरूप ( positive ) जाणीव काव्यप्रेमी वाचकांतच काय, पण कविजनांतही निर्माण झाली नव्हती. केशसुत हे दत्तांच्या दृष्टीने केवळ एक महत्त्वाचे समकालीन कवी असावेत, मुंबईस एका वेळी राहात असतानाही त्यांचा प्रत्यक्ष सहवासही घडलेला नव्हता. दत्तांना आपल्या अल्पायुष्यात ज्या कविमित्रांचा मर्यादित पण उत्कट सहवास लाभला, ते दोन कवी म्हणजे रे. ना. वा. टिळक आणि चंद्रशेखर हेच होते. त्यांपैकी टिळकांची स्फूर्ती आणि प्रेरणा दत्तांच्या काही कवितांच्या, विशेषतः त्यांच्या शिशुगीतांच्या पाठीशी असली, तरी त्यांच्या तत्त्वचिंतक, बोधवादी दृष्टीचा परिणाम दत्तांवर झालेला दिसत नाही. या वस्तुस्थितीमागे या दोन काव्यात्म व्यक्तिमत्त्वांमधील मूलभूत भिन्नताच कारण होती. पुढे बडोद्याचे राजकवी झालेले चंद्रशेखर हे तर अर्वाचीन काळातील पंडितीयुगाचे अखेरचे व प्रमुख प्रतिनिधी होते! जुन्या संस्कारांचे आणि परंपरेचे लेणे अंतर्बाह्य लेवूनच त्यांची कविता आपले पारंपरिक विचारधन आणि संस्कृतप्रचुर भाषेचे घोटीव सौंदर्य व सौष्ठव मिरवीत संथपणे वाटचाल करीत होती. दत्तांच्या कविमनावर झालेल्या विविध संस्कारांमध्ये अशा रीतीने मोठीच संमिश्रता होती हे तर आपण पाहिलेच आहे. या सर्व संस्कारांचेच संमिश्र प्रतिबिंब दत्तांच्या निसर्ग-काव्यात उमटले आहे.

दत्तांच्या निसर्गपर कवितांमधून वास्तव जीवनात अतृप्त राहिलेल्या त्यांच्या भावजीवी, तरल व रसिक मनाच्या अतृप्त आकांक्षांचा प्रत्यय जसा उत्कटपणे येतो, तसेच त्यांच्या कवित्वावर उमटलेले विदग्ध संस्कृत वाङ्मयाचे सखोल संस्कारही जाणवल्या-वाचून राहात नाहीत. दत्तांच्या ४८ कविता आज आपल्यापुढे आहेत. आपल्या मृत्यु-शय्येवर जी कवितावही दत्तांनी चंद्रशेखरांच्या हाती दिली, त्या वहीत लिहिलेल्या एकूण कवितांची संख्या मात्र शंभराच्या आसपास होती. १९२१ मध्ये, दत्तांच्या निधनानंतर बावीस वर्षांनी, त्यांची कविता संकलित व प्रसिद्ध करताना त्यांचे चिरंजीव कै. वि. द. घाटे यांनी आपल्या वडिलांच्या सर्व उपलब्ध कवितांची कसोशीने पाहाणी केली आणि त्यांतून ज्या कवितांची निवड त्यांना करावीशी वाटली त्याच कविता या संग्रहात त्यांनी समाविष्ट केल्या. ज्या कविता त्यांना वगळाव्याशा वाटल्या त्या त्रोटक, चुटकेवजा, प्रासंगिक किंवा उत्तान शृंगारिक स्वरूपाच्या अथवा वैराग्यपर होत्या. " प्रभुराया। वाया ही नरकाया। दावी तव पाया " अशासारख्या निवृत्तीपर रचलेल्या ओळींवरून

किंवा ' तनू हेची तीर्थ ', ' शिमगा ', ' विधवाविलाप ', ' दुर्व्यसनमाला ' वगैरे कवितांच्या शीर्षकांवरूनही महाविद्यालयीन विद्यार्थिदशेतील त्यांच्या काव्यसाधनेची कल्पना येते. या काव्यात भावनेची उत्कटता किंवा लक्षणीय कल्पनाविलास नसला तरी क्वचित भाषेचा साधेपणा व प्रेमळपणा मात्र लक्ष वेधून घेतो. अहमदनगरला असताना, लहान वयातच, वामन, श्रीधर, रामजोशी वगैरे जुन्या कवींचे आणि परशुरामतात्या गोडबोले यांच्या ' नवनीता 'चे जे वाचन त्यांनी केले, त्याचा ठसा या आरंभीच्या कवितांवर उमटलेला स्पष्टपणे जाणवतो.

दत्तांच्या खऱ्याखुऱ्या वैशिष्ट्यपूर्ण कविता इंदूर आणि बडोदे येथेच अखेरच्या ४–५ वर्षांतच झालेल्या आढळतात. या कवितांमध्ये सामान्यतः निसर्गपर म्हणता येईल अशा कवितांची संख्या जवळजवळ १४ आहे. ' सखे सुमनमाले ', ' मुग्ध कलिका ', ' कुसमलालन ', ' कोकिळकूजित ', ' बाई लतिके ! ', ' विश्वामित्रीच्या कांठी ' ही त्यांच्या काही निसर्गकवितांची नावे.

दत्तांच्या या निसर्गकवितांचे अंतरंग आणि त्यांचे खरे वैशिष्ट्य जवळून पाहाण्या-पूर्वी त्यांचा स्थूल परिचय करून घेणे श्रेयस्कर ठरेल. ' सखे सुमनमाले ', ' बाई लतिके ', ' मित्रा विहंगा ', आणि ' सख्या वसंतवाता ' ही काही कवितांची नावे पाहिली तरी जाणवेल की या कविता म्हणजे निसर्गातील एखाद्या विशिष्ट सौंदर्यरूपाला उद्देशून केलेल्या उद्देशिका आहेत. या निसर्गरूपांबद्दल कविमनाला वाटणारी जवळीक आणि स्नेहशीलता, ' बाई ', ' मित्रा ', ' सखे ' इत्यादी स्नेहाळ संबोधनांमधूनही व्यक्त होत आहे. तसेच या कविता केवळ वर्णनपर नसून, या निसर्गघटकांच्या रूपाने कवीने आपल्या हृदयस्थ भावनांचाच मुक्त व रसरशीत आविष्कार केला आहे आणि तो करतानाच, या निसर्गरूपांनाही सचेतनत्व दिले आहे, त्यांचेही मानवीकरण केले आहे. ' सखे सुमनमाले ' आणि ' सख्या वसंतवाता ' या दोन्ही कवितांमध्ये नाजूक सुमनमालेच्या आणि वसंतातील शीतल वायूच्या स्पर्शाने द्विगुणित झालेली आपली विरहभावनाच कवीने मोठ्या कलाकतेने आणि चातुर्याने आळवली आहे. निसर्गाच्या साहाय्याने किंवा त्याच्या निमित्ताने रेखाटलेले हे संस्कृतातील विप्रलंभ ( विरहातील ) शृंगाराचेच कल्पक आणि मनोहर चित्रण होय. सुमनमालेला उद्देशून ते म्हणतात,

**' सुबक वर्तुलशा केशकलापांत । तुला असते ठेविले मी सुखांत,**
**सप्त ऐशा पडलीस उरीं आता । भोग माले, मजसवें विरहचिंता**
**स्पर्श शीतल संताप वाढवीतो । सुमनगंधेही शूल शिरीं होतो**
**पहा दैवाची कशी उलट रीत । सुखद वस्तूही दुःख मना देती. "**

वसंतातला हा शीतल वाराही आपल्याला तापदायक का भासतो हे सांगताना ते मोठ्या चातुर्याने म्हणतात,

"छे! पण पवना! होशिल शीतल कसा तिला स्पर्शुनी,
अळते विरहें जी निशिदिनीं।
उष्णश्वासें सखिच्या तूंही उष्ण तसा जाहला,
सहवासानें गुण लागला!"

'बाई लतिके' या भावमधुर कवितेमध्ये लतिकेला त्यांनी विलोभनीय स्त्रीत्वाच्या रूपामध्येच पाहिले आहे, आणि तिचे चित्रण त्याच दृष्टीने परोपरीने केले आहे.

"थरथर कांपतेस पवनें, छळिलें कां तुज सांग मला गे निर्दय मदनाने?
लाजु नको, मज सांग सखे, कुणि नाही इथे परके, हे कां लक्षण प्रेमाचे?"

या भावपूर्ण ओळी वाचताना अंर्तयामी हेच जाणवते की, आपल्या जीवसखीबद्दलच्या रसिक, सोत्कंठ कल्पनांचेच आरोपण कवीने इथे लतिकेवर केले आहे. म्हणूनच की काय, या कवितेतील शब्दरचनाही साधी, जिव्हाळ्याची, जणू एखाद्या जिवलग व्यक्तीशी गुजगोष्टी कराव्यात तशी झाली आहे. संस्कृत काव्यनाट्यातील संकेतांच्या धर्तीवर कल्पनाप्राचुर्य तर इथे मुक्त हस्ताने उधळले आहे. सांकेतिकतेप्रमाणेच बोधपरतेचाही प्रत्यय, "पतिला कवटाळुनि राही, कारण त्यासम सौख्य जगीं या अन्य तुला नाही" अशा ओळींमध्ये आल्यावाचून राहात नाही. 'कोकिलकूजित' या कवितेची कल्पना विशेष वैशिष्ट्यपूर्ण आहे. वसंतराजाची दूती असलेली कुणी कोकिला त्याच्या आगमनाची द्वाही सर्व सृष्टीत फिरवीत आहे आणि त्याच्या स्वागतसोहळ्याची सिद्धता करण्याचे आवाहन सभोवतीच्या निसर्गाला करीत आहे अशी या कवितेची मोठी अभिनव कल्पना आहे. या कवितेतील रमणीय वर्णनामध्येही सृष्टीतील सर्व घटकांचे कवीने मानवीकरण केले आहे. "तन्वंगी सरितांनी प्रेमें नाचावे, गावें, तुंग गिरींनी वसंतवैभव जगता दावावे तालतरूनें छत्र, कीचकें चामर ढाळावे, तरुलतिकांनी विनये वांकुनी राया वंदावे."

या नमुन्यादाखल घेतलेल्या ओळींमध्ये दत्तांच्या भाषेतील ओघ, प्रवाहित्व आणि संस्कृत वाङ्मयाच्या संस्कारांत सुस्नात झालेले शब्दसौष्ठव व नादमाधुर्य यांचीही कल्पना येते. 'मुग्ध कलिका' ही रमणीय कविता म्हणजे दत्तांच्या कल्पकतेचा केवळ सुरम्य विलासच होय. उत्प्रेक्षा, रूपक, अपह्नुती या अलंकारांचा इथे जणू सडाच पडला आहे. मुग्ध कलिकेला पाहून उत्तेजित झालेली कवीची कल्पकता नाना वैचित्र्यपूर्ण कल्पनांचे आरोपण तिच्यावर करीत आहे. आणि ते करतानाच उत्कट मानवी भावनांचे ओघही तिच्यात मिसळले आहेत.

"गे लते, क्षमा कर निर्दय या ह्याताला।
तुजपासुनि तोडुनि नेई जो कलिकेला
दुहिताजन हे श्रम परक्याचे सुख ठावे
मनिं करुनि विवेका विवश असे कंठावे"

या ओळी वरील विधानाचीच साक्ष देतील. "प्रभात" ही कविता बालकवींच्या "श्रावणमासा"ची आठवण करून देणारी आहे.

> " खळखळ वाहत लगबग येती तटिनी गिरिवरुनी
> देवदर्शना जगूं चालल्या भाविक या तरुणी "

ही यातील कल्पनाच वानगीदाखल पाहा. दत्तांना सृष्टीमध्ये सदैव मानवी व्यापार दिसत होते. या संदर्भात त्यांचे साम्य संस्कृत कवींशीच विशेषत्वाने दिसते. 'विश्वामित्रीच्या काठीं' ही दत्तांची कविता, तिच्यातील अवर्णनीय प्रसन्नता, मृदुमधुर शब्दयोजना, रचनेची नादमधुर गेयता आणि गाढ सौंदर्याच्या प्रचीतीने रसार्द्र, भावार्द्र झालेले वातावरण यामुळे अतिशय उठावदार आणि अविस्मरणीय झाली आहे. दत्तांचे ज्येष्ठ कविमित्र चंद्रशेखर यांनीच आपल्या प्रस्तावनेत म्हटल्याप्रमाणे, दत्त निसर्गाचे एकनिष्ठ उपासक होते आणि त्याच्या निकट सान्निध्यात जाऊन सृष्टिसौंदर्याचे निरीक्षण करण्यात त्यांच्या वृत्ती दंग होत असत. परंतु याचे मर्म नेमके कशात होते? कलावंताचे, कवीचे निसर्गप्रेम तसे दुर्मिळ थोडेच आहे? कोणत्या कवीचे मन सहजगत्याच निसर्गाकडे ओढ घेत नाही? निसर्गसान्निध्यात फुलून येत नाही? दत्तांचे निसर्गप्रेम अशा सर्वसाधारण पातळीवरचेच होते काय? की त्याचे अंतरंग काही वेगळे होते? दत्तांच्या निसर्गकविता या केवळ वर्णनपर निसर्गकविता आहेत काय? या प्रश्नांची उत्तरे शोधतानाच, दत्तांच्या निसर्गकवितेचेही मर्म हाती येते.

प्रत्येक रसिकाची कलेतील सौंदर्याला भिडण्याची जशी काही विशिष्ट क्षेत्रे असतात तशीच प्रत्येक कलावंताच्या संवेदनांचीही काही विवक्षित क्षेत्रे असतात; या क्षेत्रांतच त्याच्या भावना व कल्पना अधिकाअधिक उत्तेजित होतात, तीव्र तरळ होतात, त्याच्या काव्यात्म जाणिवेलाही येथेच अग्र येते. आणि देठाच्या टोकाशी फूल उमलून यावे, तशा तरळ, तीव्र झालेल्या या जाणिवेच्या पोटी त्याच्या कलाकृतीचे फूल सहजपणेच फुलून येते. दत्तांना हे संवेदनांचे क्षेत्र, ही यक्षभूमी, गवसली ती निसर्गात! त्यांनी ऐन तारुण्यात आपल्या नवथर मनाची सारी स्वप्नरम्यता, आणि अधीऱ्या, अतृप्त आकांक्षा यांचे प्रतिबिंब पाहिले ते निसर्गाच्याच दर्पणात! म्हणूनच निसर्गाचे सूक्ष्म, हुबेहूब, जिवंत चित्रण त्यांच्या निसर्गकाव्यात आढळेल अशी अपेक्षा केली तर ती मात्र बरोबर ठरणार नाही. उलट सत्य असे की, दत्तांच्या या निसर्गपर कवितांत निसर्गाचे प्रत्ययकारी किंवा तंतोतंत चित्रण शोधू गेलो, तर सहसा ते आढळणार नाही! म्हणूनच की काय, दत्तांच्या या सृष्टिवर्णनपर कवितांची स्थिती 'तो टाकुनी उदकपूर्ण घटा घरात, प्याया सदा मृगजळ फिरतो वनात!' अशी झाली असल्याची टीका रविकिरण मंडळाचे एक ज्येष्ठ सदस्य कवी माधव जूलियन् यांनी केली आहे. इतकेच नव्हे, तर अनेक कवितांत "सुललित शब्दांच्या गर्द मंडपात कल्पकतेचा कुतूहलजनक विलास मात्र दिसतो, हृदयास हलवून सोडील असे काही आढळत नाही. फार काय भिन्न भिन्न काळीं गोचर होणाऱ्या

देखाव्यांचा संकर आणि विपर्यासही त्यांच्या अनेक वर्णनांत आढळतो " असेही भाष्य त्यांनी परखडपणे केले आहे. खरे तर दत्तांच्या निसर्गपर काव्यात निसर्ग फारसा दिसतही नाही! परंतु याचा अर्थ केशवसुत, टिळक या समकालीन कवींमध्ये निसर्गपर कविता लिहिण्याची टूम निघाली होती, म्हणूनच दत्तांनी या सृष्टिवर्णनपर कविता रचल्या आणि शेले, वर्ड्स्वर्थ, बायरन इ. आंग्ल कवींचे त्यांनी इमाने इतबारे केलेले अनुकरणच केवळ या कवितांच्या मुळाशी आहे, असे मात्र निःसंशय नाही.

जुन्या व नव्या, संस्कृत व इंग्रजी आणि पारंपारिक व सुधारकी अशा उभयविध संस्कारांचा समन्वय किंवा संकर दत्तांच्या व्यक्तिमत्त्वात आणि कवित्वात झाला होता हे जमेस धरूनही, दत्तांच्या निसर्गकवितेत त्या काळच्या पार्श्वभूमीवरील त्यांचे स्वतःचे असे वैशिष्ट्य निश्चितपणे व्यक्त झालेले जाणवते. कवितेमधील आत्मप्रत्यय किंवा अंतर्मुख वृत्तीने केलेला आत्माविष्कार यांच्या सुस्पष्ट खुणा दत्तांच्या एकूण काव्यात तशा मोजक्याच आहेत. परंतु जे आत्मलेखन भावकवितेच्या स्वाभाविक वाटेने क्वचितच झाले, त्याचा हृदयंगम आणि हृदयस्पर्शी प्रत्यय दत्तांच्या या निसर्गकवितांतून मात्र सर्वत्र येतो. निसर्गाचे दृष्टिगोचर आणि वास्तव चित्रण या काव्यात नसले तरी कविमनाच्या स्वप्न-भूमीत निसर्गाला निःसंशय एक सचेतन जिव्हाळ्याचे स्थान आहे. 'बाई लतिके', 'मुग्ध कलिका' यांसारख्या कवितांमधील उत्प्रेक्षासौंदर्य संस्कृत संस्कारांचे स्मरण करून देणारे आहेच, तरीही त्यातून जी प्रतीती येते ती कवीच्याच हृदयस्थ भावनांची. "सख्या वसंतवाता"ला प्रेमाने आवाहन करतानाही मेघदूतातील विरही यक्षाच्या सुरात सूर मिसळून

**" पुरे कशाला हवे मला ते, स्मरण जिवा जाळिते**
**त्यांतुनि वहन तुझे झोंबते**
**तापद होशिल तर हो पवना, परि आलिंगिन तुला,**
**देइन प्याया अश्रुजला;**
**निरोप सखिचा सांगशील तूं, म्हणुनि तुला भेटतो**
**सांग बा हीच भीक मागतो "**

असेच भावोत्कट उद्‌गार त्यांनी काढले आहेत.

अनेकदा हे कविमन निसर्गाकडे आपल्या भावस्थितीच्या आविष्काराचे एक निमित्त, तिला चालना देणारे साधन म्हणून पाहाते. कधी निसर्ग हाच कविमनासमोर अंधुकपणे तरळणारा एक पारदर्शी पडदा बनतो आणि त्यापलीकडे कविमनाने जपलेल्या सुखद स्मृतींचे किंवा त्याच्या अतृप्त स्वप्नांचे भावविश्व दडलेले असते. म्हणूनच ही कविता अनेकदा कवीच्याच सोत्कंठ भावस्थितीचे मूर्तिमंत चित्र बनते. कधीकधी तर या दोहोंमधील अंतरही नाहीसे होऊन कवीचीच भावसृष्टी किंबहुना त्याचे भावजीवी मनच साक्षात् त्या निसर्गकवितेत अवतरल्याचेही जाणवते. अशा वेळी ही निसर्गकविता हीच

कवीची खरीखुरी भावकविता होते. हे निसर्गचित्र जितके विलोभनीय, जितके परिपूर्ण, तितकी ती भावस्थितीही अधिक जिवंत होते आणि हे जेथे घडत नाही तेथे मात्र निसर्गत्वही लोपते आणि कवीच्या भावस्थितीचा सच्चेपणाही निसटून जातो; मग उरते केवळ चमत्कृतिपूर्ण उत्प्रेक्षांची, अलंकारांची उतरंड आणि थेट संस्कृत काव्यनाट्यातून उतरलेल्या अतिशयोक्तिपूर्ण कल्पनांचे वरपांगी विभ्रम !

निसर्गरूपातही कवीच्या भावविलसितांचे हे रंग असे सतत का मिसळले? त्यांचा आत्माविष्कार निसर्गकवितेमधूनही असा व इतक्या उत्कटतेने का झाला ? याचे एक उत्तर त्यांच्या आंतरिक व्यक्तिमत्त्वाचा शोध घेताना जसे मिळू शकते, तसेच ते त्या काळाच्या वाङ्मयीन संकेतांमध्ये आणि रूढिनियमांच्या बंदिस्त चौकटीमध्ये मिळू शकेल. अधिक मुक्त, उदार आणि सुसंवादी अशा नवजीवनाची स्वप्ने पाहणारे हे कविमन या संकुचित सामाजिक चौकटीत अडकले होते, आपल्या असंतुष्ट, अतृप्त मनाला मोकळी वाट शोधत होते, प्रत्यक्षात 'रमणी' हवी होती, पण मिळत होता केवळ 'वसंतवात'! वास्तवातली अपूर्णता व असमाधान पूर्ण करण्याच्या या ध्यासात कवितासुंदरीही या नादी कविमनापुढे प्रकटत होती ती हव्याहव्याशा वाटणाऱ्या विलोभनीय स्त्रीत्वाची, कामिनीची साक्षात् प्रतिमा बनूनच! कवितेला प्रणयिनी कल्पून तिची आळवणी करण्याचा संकेतही इंग्रजी काव्यातूनच मराठीत आला होता. ('La belle dame Sans merci') ही कीट्सची प्रसिद्ध प्रेमकविता प्रत्यक्षात कवितासुंदरीबद्दलच होती. आपल्या काळाच्याही पुढे गेलेल्या आणि समाजाच्या रूढ चौकटीत चपखलपणे न बसणाऱ्या, त्या पिढीतील साऱ्याच भावनाप्रधान कवींचे हे एक अटळ प्राक्तन होते. म्हणूनच एकांत झाला तोही कवितेशीच, आणि आर्जव, आराधना, मनधरणी झाली तीही कवितासुंदरीचीच! म्हणूनच 'जिने मला वेडा केले तिच्यावरी ही फिर्याद!' अशी कैफियत केशवसुतांनीही गाइली आणि 'बघसी अंत किती राजसे' असे कवितेचेच भावार्त आराधन दत्तांनाही करावे लागले! स्त्री-पुरुष नात्यामध्ये जे अत्यंत वैयक्तिक आणि नाजूक ते सरळ मार्गाने नव्हे, तर अशा इतर माध्यमातून आडवळणाने प्रकट होताना साहजिकच त्यात कृत्रिमतेचा आणि सांकेतिकतेचाही शिरकाव झाला. दत्तांच्या निसर्गकविताही त्याला अपवाद ठरल्या नाहीत. परंतु सामाजिक निर्बंधाच्या बंदिस्त पार्श्वभूमीवर रसिक भावनाप्रधान कविमनाची ही भावनिक ओढ पाहिली, तिच्यातील सच्चेपणा अंतर्यामी जाणवला, म्हणजे त्यांची कविता किंवा त्याने रेखाटलेला निसर्ग या दोहोंमधल्या संकेतांची बोचक धार आणि नकोशी वाटणारी कृत्रिमताही नकळता नाहीशी होते, समजू लागते. आणि वास्तवात न गवसणारे भावबंध व भावविश्व निसर्गात व काव्यात शोधू पाहणाऱ्या या अतृप्त कविमनाचे, कधी 'वसंतवाता'शी, कधी 'बाई लतिकेशी' तर कधी 'सखी सुमनमालेशी' होणारे हे जिवाभावाचे हितगुज आपल्याही मनाला भिडू लागते... सामाजिक निर्बंधाच्या दडपणाखाली सच्ची कविताही कशा अनैसर्गिक वळणांनी जात होती याची प्रचीती दत्तांच्याच नव्हे, तर त्या काळातील अनेक

कवींच्या काव्यातून प्रत्यक्षाप्रत्यक्षपणे येते. कवीच्या व्यक्तिमत्त्वानुसार आणि प्रकृतिधर्मानुसार हे पर्यवसानही साहजिकच भिन्नभिन्न स्वरूपात झालेले आढळते. केशवसुतांच्या निसर्ग-कवितेतही फूल, फुलपाखरू, भुंगा हे निसर्गाचे घटक व त्यांचे सौंदर्य बाजूलाच राहून मानवी जीवनाची दुःखमय अपूर्णता व तत्त्वचिंतनच डोके वर काढते, तर टिळकांमधील तत्त्वचिंतक, " पर्वतारोहण " करतानाही " वर खाली जाण्या पथ हा नरजन्माचे परी " अशा तात्त्विकतेचाच अस्थायी आश्रय करतो. आणि रेंदाळकरांसारखा अशारीर प्रेमाची गीते गाणारा कवी " सर्वत्रहि भुवनीं बघतो तुजला नित्य पण देवी ! शांतता लवही न मिळे सत्य ! " असेच निराशेचे उद्‌गार सृष्टीच्या सान्निध्यातही काढतो. अटळ सामाजिक निर्बंधापुढे नियतीनेच उभे केलेले, कधी बंडखोरपणे समोर ठाकलेले, तर कधी शरणागत झालेले आणि कधी त्यातूनच आपली वाट शोधणारे हे असे भावसंकुल आणि संवेदनक्षम व्यक्तिमत्त्व केशवसुतांच्या आणि त्यांच्या समकालीनांच्या काव्यात पुन्हा पुन्हा जाणवत राहते. दत्तही त्याला अपवाद ठरले नाहीत.

संस्कृत वाङ्मयाच्या परिशीलनामधून दत्तांच्या रचनेतील कल्पनाचमत्कृतीचा आणि संस्कृतप्राचुर्याचा परिणाम वाढला असला तरी पुढे बालकवींच्या कवितेत ज्यांचा सहज-सुंदर उत्कर्ष झाला, अशा काही वैशिष्ट्यांची चाहूल प्रथम दत्तांच्याच निसर्गकवितेत येते. दत्त आणि बालकवी दोघेही अल्पायुषी– कविता ऐन बहरात असतानाच उभयतांचे जीवनच अकाली खंडित झाले. या दोघांच्याही काव्यात जसे काही समांतर प्रवाह दिसतात, तसेच कविदृष्टीचे, कवि-प्रकृतीचे साम्यही जाणवते. अहमदनगरच्या वास्तव्यात दोघांचाही ख्रिश्चन मिशनरी समाजाशी निकट संबंध आलेला; रे. टिळकांचा ऋणानुबंध कमीअधिक प्रमाणात दोघांनाही लाभलेला; इंग्रजी, संस्कृत वाङ्मयाचा अभ्यास आणि व्यासंग दत्तांनी जसा केला तसा तो बालकवींनी मात्र सहेतुकपणे केला नसावा. म्हणूनच की काय, तसे संस्कृतप्राचुर्य असूनही बालकवींच्या शैलीत जी सुकुमार कोवळीक, जो उत्स्फूर्त ताजेपणा आणि उत्फुल्ल सौंदर्य प्रत्यही जाणवते, तसे ते दत्तांच्या काव्यात जाणवत नाही. संस्कृतचे संस्कार दत्तांच्या भाषेने आत्मसात केले व त्यातूनच एक डौलदार सौष्ठव आणि प्रवाहित्व तिला लाभले असले तरी अकृत्रिम सहजतेचे लावण्य मात्र तिला पारखेच झाले. बालकवींची पिढी ही दत्तांच्या पुढची पिढी. पारंपरिक परि-णामातून आणि संस्कारातून बालकवींची कविता सहजगत्याच दूर राहिली. आणि कळीचे फूल व्हावे तितक्या सहजपणे फुलत राहिली, ते भाग्य व ते स्थान दत्तांना लाभले नाही. प्रापंचिक असमाधानाचे उदास सूर दोघांच्याही काव्यात भरून राहिले आणि स्नेहावाचून जळणाऱ्या दीपकाचे एकाकीपण दोघांच्याही वाट्याला आले ! म्हणूनच की काय दोघांचीही निसर्गकविता हीच त्यांची भावकविता झाली. ज्या चैतन्यमय स्वरूपात स्नेहाळ-मनाने बालकवींनी निसर्गाचे दर्शन घेतले आणि आपल्या अतृप्त भावनांची, स्वप्नांची पूर्तीही निसर्गातच अनुभवली, तशीच दत्तांच्या निसर्गकवितेतही निसर्गाच्या या सचेतन-त्वाचीच सतत प्रचीती येते. किंबहुना निसर्गचित्रणातून कविमनाने आपली भावस्थिती

आणि सुखदुःखादी मानसिक आंदोलने व्यक्त करण्याच्या या प्रवृत्तीची पहिली-वहिली चाहूल निःसंशय दत्तांच्याच निसर्गकवितेत प्रथम आढळते. बालकवींच्या रचनेतील विलोभनीय सहजता, त्यांची स्वतंत्र मूलगामी कल्पनारम्यता आणि स्वतःच्या अंतर्मनात खोल डोकावून पाहाताना त्यांच्या अंतःकरणाचा झालेला उत्कट आविष्कार हे बालकवींचे निखळ वैशिष्ट्य दत्तांच्या कवितेत फारसे सापडणार नाही. तरीही या उभयतांच्या कवितेमधील हे नाजूक नाते आज निश्चितपणे जाणवल्यावाचून राहात नाही. दत्तांच्या काव्यात भरून राहिलेल्या कल्पनाचमत्कृतीच्या आणि भाषेतील संस्कृत प्राचुर्याच्या या वातावरणातही काही अकृत्रिम आणि हृद्य सौंदर्याच्या विलोभनीय छटा अधूनमधून अर्थातच भेटतात.

'विश्वामित्रीच्या काठीं' या सुंदर कवितेचा हा आरंभच पाहा– 'बघुनि मन धाले, साफल्य दृष्टिचे झाले' या सहजस्फूर्त उद्‌गारात एका सौंदर्यासक्त मनाची धन्यता कशी भरून राहिली आहे! "न कळे काही, जिव वेडावुनि हा जाई।" हा निखळ सौंदर्याने भारलेल्या मनाचा भाबडा आविष्कारही असाच चटका लावतो. परंतु त्याही-पेक्षा 'जेथे असली श्रेष्ठ मंडळी, तिथेच गरिबा जागा दिधली।' या ओळीत प्रकट झालेली हृदयंगम, विनीत भावना आणि कवितेच्या अखेरीस काढलेल्या "स्मरणशक्तिके जागृत होई दर्शनदुर्लभ शोभा पाही। वारंवार कोठुनी असे दिसणार" या उद्‌गारातील नितांत कृतज्ञतेची, कृतार्थतेची जाणीव व शांतरसाची प्रचीती मनाचा अधिकच ठाव घेते. पौर्णिमेच्या चांदण्यात नाहून निघत असतानाच त्यांच्या अंतःकरणाला परतत्त्वाचा स्पर्श होतो आणि अनिर्वचनीय आनंदाच्या लहरी त्यातून उसळू लागतात. भावना, कल्पना आणि रचना या तिहेरी दृष्टीने दत्तांची ही एक प्रसन्न व संस्मरणीय कविता होय. दत्तांच्या रसिक मनाला प्रणयाचे स्वाभाविक अनावर आकर्षण होते. पाण्यात प्रतिबिंबित झालेल्या चंद्राकडे पाहूनही 'तटिनीने जणुं हृदयीं धरिला, प्रेमळ कांत– पाहुनि इथे एकांत" अशी रसीली कल्पना त्यांच्या मनात तरळते आणि तरीही सौंदर्यातिशयाच्या या धुंदीतही कुठेतरी अंतरस्थ कारुण्याची एक लकेर जाणवल्यावाचून राहात नाही. किंबहुना रसिकाला हुरहूर लावणारे हे कोवळे कारुण्य आणि रसील्या वृत्तीची यौवनशाली उन्मादकता या दत्तांच्या व्यक्तिमत्त्वाच्याच दोन बाजू! त्यांच्या इतर काव्यातही त्यांचा प्रत्यय येतोच. 'प्रतिभाविहंगा'ला उद्देशून लिहिलेल्या त्यांच्या कवितेतही साऱ्या संकेतांचे पटल दूर सारणारी एक नवी मर्मस्पर्शी जाण कशी दिसते पाहा–

ते म्हणतात–

> "सृष्टीच इंद्रनगरी अलकाही तीच
> कैलास तीच, कविताजननीहि तीच
> अंकीं तिच्या विहरतां कविबालकातें
> त्रैलोक्य तुच्छ, चल दाखिव सृष्टि मातें"

कैलास, इंद्रपुरी, अलकावती सारे झूट आहे. जे आहे ते सारे इथेच आहे. या सृष्टीतच आहे! तेच मला डोळे भरून पाहू दे. त्रैलोक्याला तुच्छ मानून सृष्टीलाच जवळ करणारे हे गाढ प्रेम आणि हा स्नेहभावच दत्तांच्या निसर्गकवितेच्या गाभ्याशी आहे. सृष्टी आणि कविता या दोघींच्याही ठायी त्यांच्या जीवाचे मैत्र गुंतले होते. आपल्या रसिक मनाची स्वप्नातील जीवसखीशी निगडित झालेली सारी स्वप्ने त्यांनी सृष्टीच्या आणि कवितेच्याच सचेतन रूपामध्ये पाहिली होती. हे तादात्म्य आणि ही समरसता केवळ वरपांगी नव्हती. तिने त्यांच्या अंतःकरणाचाच ठाव घेतला होता. म्हणूनच कधीकधी त्यांच्या नवतरुण मनाला भावलेली ही तिन्ही लोभस रूपे बघताबघता परस्परात मिसळून जातात, एक नवेच रूप धारण करतात आणि हे अधीरे कविमन त्यांचीच आळवणी परोपरीने करू लागते!

# भावकविता



कोवळ्या वयातच दत्तांच्या संस्कारक्षम मनावर झालेल्या वाङ्मयीन आणि सामाजिक संस्कारांचे स्वरूप कसे संमिश्र आणि बहुविध होते ते आपण आरंभीच पाहिले. त्यांच्या भावसृष्टीची घडण जशी शेले, बायरन इत्यादी आंग्ल कवींच्या कवितेमुळे झाली तशीच संस्कृतातील रसोद्ग्राही आणि विदग्ध काव्यनाट्याचीही मोहिनी त्यांच्या मनावर आरंभापासून पडली होती. नामदेव, तुकारामादी संतकवींची अमृतवाणी जशी बालपणापासूनच त्यांच्या कानी पडली, तशीच शाहिरांची धीट, दिलखुलास शृंगारिक रचनाही त्यांच्या रसिक मनाला आकृष्ट करीत असावी, याची प्रचीतीही त्यांच्या काही लावणीवजा कवितांमध्ये आणि त्यातील धीट, शृंगारिक वळणामध्ये सहजगत्याच येते. या संस्कारांच्या संमिश्र धाग्यांमधूनच दत्तांच्या कवित्वाची वीण तयार झाली आहे. तिचे रंगरूप आणि तिचे पोत या सर्वांच्या पाठीशी हे संस्कारधन आहे हे विसरता येणार नाही, आणि याचा सर्वांत अधिक प्रत्यय येतो तो दत्तांच्या मोजक्याच भावकवितांमध्ये! त्यांचे अंतर्मन आणि अंतर्जीवनही प्रत्यक्ष-अप्रत्यक्षपणे या कवितांमधूनच खुले होते.

भावकविता ही काव्याच्या सर्वच आविष्कारात कवीच्या व्यक्तिमत्त्वाच्या अधिकाधिक जवळ जाणारी; म्हणूनच कोणत्याही कवीच्या भावकवितेकडे वळण्यापूर्वी त्या काळातील सामाजिक परिस्थिती व तिचा कवीच्या व्यक्तिमत्त्वावर अपरिहार्यपणे होणारा परिणाम, इतर समकालिनांची कविता व तिच्यातून डोकावणारे त्या काळातलेच कविमन यांचा विचार करणेही आवश्यक ठरते. दत्तांची जीवनकथा पाहाताना आपण तत्कालीन सामाजिक परिस्थितीचा काहीसा मागोवा घेतला आहे. शिक्षणाच्या वाढत्या प्रसाराने आणि इंग्रजी व इतर भाषांतील काव्यवाङ्मयाच्या मनःपूर्वक केलेल्या वाचनाने त्या काळातील तरुण, संवेदनक्षम मंडळी भारावून गेली होती. आपल्याच अंतर्यामीच्या सुप्त इच्छा-आकांक्षा त्यांच्या त्यांनाच नव्याने उमजू लागल्या होत्या. आणि त्यांची पूर्तता होण्यासाठी संसारातील आपल्या सहचरीचीही साथ मिळावी अशी स्वाभाविक आसही

त्यांच्या उत्सुक मनात निर्माण होत होती. पण विसंवाद होता तो इथेच ! त्या काळातील तरुण स्त्रीवर्ग मात्र सुधारणेच्या आणि शिक्षणाच्या या प्रवाहापासून फार दूर होता. चूल आणि मूल हेच त्यांचे बंदिस्त क्षेत्र होते. काळ होता बालविवाहांचा. परिणामी, पतिपत्नीच्या स्वभाव, इच्छा-आकांक्षा या सर्वांतच फार मोठे, नव्हे, जवळजवळ अनुल्लंघ्य असे अंतर पडे. त्यातूनच तरुण संवेदनशील मनांना वैफल्याची, नैराश्याची भावना ग्रासून टाकी. त्या वैफल्याचेच प्रतिबिंब तत्कालीन कवींच्या काव्यात स्वाभाविकपणेच उमटे. परंतु या नैसर्गिक आत्माविष्कारासही तत्कालीन काव्यातील संकेत व निर्बंध यांच्या मर्यादा पडत. या मर्यादांमधूनच त्या काळातील उदयोन्मुख कवींना आपली वाट काढावी लागत होती. याचेच प्रत्यंतर केशवसुत, टिळक, रेंदाळकर, नागेश, सुमंत, तांबे या दत्तांपेक्षा वयाने थोड्या ज्येष्ठ परंतु समकालीन व गोविंदाग्रज, बालकवी या कालमानाने थोड्या नंतरच्या कवींच्या काव्यातून स्पष्टपणे येते.

या मर्यादा आणि निर्बंध यांचे अडसर ओलांडून त्यातून पहिली वाट काढली ती केशवसुतांनीच. खऱ्या नवतेची, आधुनिकतेची ओढ लागून आणि पाश्चिमात्य भावकवितेमधून स्फूर्ती घेऊन खरी आत्मनिष्ठ कविता मराठीत लिहिली ती प्रथम केशवसुतांनीच.

अर्वाचीन मराठी काव्यात प्रेमाचा आत्माविष्कार केशवसुतांच्याच कवितेत प्रथम प्रकट झाला. तसे प्रथमपुरुषी आत्मलेखन करताना विवाहोत्तर प्रेमाच्या, विरहाच्या, पुनर्भेटीच्या काही मनोज्ञ छटाही त्यांनी व्यक्त केल्या.

> " दुर्दैवें तुज सोडुनी जरि दुरी लागे फिरावे मला !
> प्रीति आणिक तूं शिवाय न सुचे काही मना माझिया "

हा साधा पण उत्कट आत्माविष्कार पाहा. त्याबरोबरच,

> " कालें आणिक कष्टदशेनें
> क्षीणत्वाला होते जाणें
> सगळ्यांचेहि, परी प्रीतिचा
> जोम वाढतो उलटा साचा "

असे प्रेमाचे तत्त्वज्ञानही काही ठिकाणी व्यक्त झाले आणि

> " दो हृदयांच्या संगमसमयी कसल्या लौकिक रीति–
> घेऊन बससी ! सोड लाडके मर्यादेची स्फीति "

असे धिटाईचे आवाहनही क्वचित जाणवते. शेले, बायरन या इंग्रजी कवींच्या प्रेमगीतांचाही परिणाम केशवसुतांच्या प्रेमकवितांवर झालेला आढळतो. तर टिळकांचा आध्यात्मिक ध्येयवाद, आदर्शवाद आणि भक्तिप्रवणता त्यांच्या प्रेमकाव्यातूनही व्यक्त झालेली दिसते.

केशवसुतांची प्रीतीची भाषा लौकिक होती, येथलीच होती, तर टिळकांची मात्र अलौकिक आहे. ' गे तुझे गे चलनवलन प्रेमभंगे शुभांगी । पाहोनिया मनिं सहज हो पूज्यबुद्धीच जागी ॥ हे टिळकांचे उद्‌गार याचीच साक्ष देतील. ' काम निराळा आणि प्रेम निराळे ' ही टिळकांची विचारसरणीही त्यांच्या अनेक प्रेमगीतांतून उघड झाली आहे. बी कवींनीही प्रेमाचे ' दिव्य, विशुद्ध व उत्कट ' स्वरूपच " चांफा " सारख्या आपल्या गूढ गीतातून व्यक्त केलेले आहे. केशवसुतांच्या नंतरच्या पिढीतील रेंदाळकर, नागेश, सुमंत यांनीही दिव्य प्रेमाच्या अलौकिक स्वरूपाचाच पुरस्कार कवितेतून केलेला दिसतो.

" धन्य रसिकवर ते जगती । आत्मवंचना जे करिती ।
प्रेमब्रह्म हे एक असे । तत्त्व तया कळणार कसे ? "

ही त्यांची निरभिलाष उदात्त प्रेमाची ध्येयीभूत कल्पना होती. रेंदाळकरांच्या प्रेमगीतांमधूनही अशरीर ( Platonic ) प्रेमाचीच महती गाइलेली आढळते. याच पिढीतील कविवर्य भा. रा. तांबे यांच्या प्रेमकाव्यातही प्रेमभावनेच्या अनंत छटा मोठ्या संपन्न स्वरूपात विखुरल्या आहेत. तांब्यांची परचित्तप्रवेशाची शक्ती खरोखर असाधारण होती. मात्र रेंदाळकर– बालकवी यांच्या पिढीतील गोविंदाग्रज हेच निःसंशय मराठीतील प्रेमाचे पहिले शाहीर ठरतात. त्यांच्या प्रेमकाव्यातील घायाळ हृदयाची, बाणासारखा सरळ वेध घेणारी उत्कटता मराठी प्रेमकवितेत आजही दुर्मिळ वाटते. परंतु गोविंदाग्रज हे दत्तांच्या पुढील पिढीचे प्रतिनिधी होते, उत्तरकालीन होते.

येथे एक प्रश्न साहजिकच उद्‌भवतो तो असा की, प्रेममाहात्म्य, प्रेमातील आत्मलेखन, निसर्गाकडे पाहण्याची स्वतंत्र दृष्टी हे अर्वाचीन मराटी काव्याचे काही विशेष, केवळ इंग्रजीच्या परभृत अनुकरणामधूनच मराठीत शिरले होते काय ? खरीखुरी नवता आणि सांकेतिकतेला डावलणारी आधुनिकता यांचे पडसाद तत्कालीन काही कवींच्या वृत्तीमध्येही उमटले नव्हते काय ? नव्या जीवनाची चाहूल स्वतंत्र प्रवृत्तीच्या या कवींनाही निःसंशय ऐकू येत होती, परंतु त्यांची स्वागतशील किंबहुना बंडखोर मनःप्रवृत्ती आणि त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची पृथगात्मता यानुसार प्रत्यक्षात तिचा कमीअधिक आविष्कार होत होता एवढेच.

दत्तांना दुर्दैवाने अल्पायुष्य लाभले असले तरी अर्वाचीन मराठी काव्याच्या नवप्रवर्तनामध्ये त्यांचाही सहभाग होता यात शंका नाही. त्यांच्या काही कवितांनी तरी आधुनिक वळण सहजप्रेरणेनेच घेतले होते. प्राचीन परंपरेविरुद्ध बंडखोरी किंवा तत्सम कोणताही अभिनिवेश जाणीवपूर्वक त्याच्या मुळाशी नव्हता. त्यांच्या काव्यातील शैलीत, रचनेत व आत्माविष्कारात, जेथे जेथे आधुनिकतेचा प्रत्यय येतो, तेथे तेथे तो अगदी सहजगत्या, निरुद्देशपणे येतो. याउलट केशसुतांच्या कवितेत हे नवप्रवर्तन केवळ अधिक व्यापक आणि बहुविध स्वरूपातच नव्हे, तर कितीतरी अधिक ठाशीव, आक्रमक व सहेतुक स्वरूपात जाणवते. म्हणूनच केशवसुत हे कवींचे कवी ठरले !

दत्तांच्या कवितेत अखेरपर्यंत संस्कृतातील रूढ संकेतांबरोबरच इंग्रजी कवितांचे पडसादही ऐकू येतात. मात्र त्यांच्या काही भावकवितांमधून भावाशय आणि शैली या दोन्ही वाटांनी प्रामाणिक आत्माविष्काराची ही नवी जाणीवही वाढू लागली होती. कदाचित जी जाण पूर्वीपासूनच मनात होती, ती पुढे कवितेतही उतरू लागली. म्हणूनच या पार्श्वभूमीवर त्यांच्या भावकवितेच्या मर्यादा लक्षात घेऊनही त्यातील नव्या जाणिवेची आणि नव्या शैलीची चाहूलही लक्षणीय वाटते. वृथा कल्पनारम्यता, कृत्रिमता आणि पांडित्य यांच्यापासून सहजपणेच दूर राहिलेल्या 'मित्रा नारायणा', 'जा दृष्टीबाहेर', 'आगगाडीस', 'असंतुष्ट पती' या कवितांमधूनही त्याचीच साक्ष मिळते आणि त्यांची सच्ची भावकविता पुढे याच वाटेने वाढली असती, अधिक समृद्ध झाली असती अशी हुरहूरही मनाला लागून राहते.

दत्तांच्या भाषेबद्दल लिहिताना तिच्यावरील संस्कृत संस्कारांचा निर्देश या विवेचनात सतत झाला आहे. परंतु त्याचबरोबर हेही येथेच सांगावयास हवे की, या संस्कृत-प्राचुर्याने त्यांची भाषा सहसा जड झालेली नाही. मराठीने संस्कृतचे संस्कार अशा रीतीने सहज पेलणे, स्वतःत मुरवणेही सोपे नाही. दत्तांच्या भाषेत ते सर्वस्वी एकरूप झाले आहेत. म्हणूनच त्यांच्या संस्कृतप्रचुर भाषेतही सहसा क्लिष्टता आली नाही.

> "ही आम्रमंजिरी, हा अलिगुंजारव
> हे कोकिलगायन, हे कोमल पल्लव
> ही मधुमाधवश्री, हे सरितालाघव
> हे नवयुवतींचे विलास, हे गौरव"

'फुलांनो चला' या कवितेतील वरील ओळी वानगीदाखल पाहिल्या तरी त्यांच्या शैलीतील आणि रचनेमधील प्रवाहित्व, ओघ, तिची प्रयासरहित सहजता व प्रसाद हे सारे स्पष्टपणे जाणवते. 'कोकिळकूजित' या कवितेतही भाषेचा हा गतिमान ओघ रसिकाला स्वतःबरोबरच जणू ओढून नेतो. 'जननी आर्यभूमी' या नावाने रवींद्रनाथ टागोरांच्या गीताचे मराठी रूपांतर दत्तांनी केले होते, त्यातील भाषेचा डौल व सौष्ठवही मनाला भारून टाकणारे आहे.

> "नीलसिंधुजल धौतचरणतल
> अनिलविकंपित श्यामल अंचल
> अंबरचुंबित भाल हिमालय
> धवल मुकुट हा मस्तकिं निर्मल
> जनकजननी, जननी
> नमन तुझ्या चरणीं"

येथे प्रत्येक शब्द अर्थगर्भ आहे, त्याला त्याचे असे वजन आहे. आणि त्याबरोबरच

एका उदात्त भावनेने तो अंतर्बाह्य भारला गेला आहे. म्हणूनच या गीताची प्रवाही लय आपल्यालाही भारून टाकते. आपली कविता रसिक मित्रांच्या मैफलीत ठेक्यात गाऊन दाखवणारे दत्त हे आधुनिक मराठीतील पहिलेच कवी होते. या सर्व संस्कारांच्या जाणिवेतूनही जो प्रत्यय मनात ठसतो तो हाच की, हे बहुविध संस्कार आत्मसात करूनही दत्तांची शैली ही अखेर दत्तांची होती.

दत्तांच्या काव्यात संस्कृत काव्यपरंपरेचा परिणाम जसा दिसतो तसाच, विषय आणि आविष्कार या दोन्ही अंगांनी काव्यविषयक नव्या जाणिवांची चाहूलही लागते. त्यांच्या तशा कविता खरोखर मोजक्याच आहेत. पण त्यांतूनही जाणवणारे कवीचे आत्मलक्षी, अंतर्मुख व्यक्तिमत्त्व लक्षणीय आहे. आणि अशा कविता संख्येने जरी अल्प असल्या, तरी कधी कवितेलाच जीवसखी कल्पून त्या लिहिल्या जातात, कधी लावणीच्या धर्तीचे मुक्त शृंगारिक वळण एखाद्या कवितेत डोकावते, कधी त्या स्त्रीमनाचे अती प्रत्ययकारी दर्शन घडवितात, कधी निसर्गरूपातून आपला प्रेमभाव व्यक्त करतात आणि कधी निर्मळ आत्मलक्षी दृष्टीने स्वतःच्या भावानुभवाचाच उत्कटपणे वेध घेतात, म्हणजेच संख्येने अल्प असूनही या कवितांची कक्षा तशी मोठी, जीवनाच्या अनेक अंगांना स्पर्श करणारी आहे.

कवितेलाच प्रणयिनी मानून तिची आराधना करण्याचा संकेत हा १८८५ नंतरच्या बऱ्याच काव्याचा एक महत्त्वाचा व अपरिहार्य विशेष होता. खरे तर ते लोणही इंग्रजी काव्यामधूनच मराठीत आले होते. शेक्सपिअरपासूनच इंग्रजी काव्यात कवितेला प्रेयसी मानून तिचे आराधन करण्याची प्रथा दिसते. कीट्सचे प्रसिद्ध भावगीत La belle dame Sans merci हे अशाच प्रतीकात्मक स्वरूपाचे आहे. शेक्सपिअरला बव्हंशी समकालीन असणाऱ्या सिडने, मार्लो, सरे या कवींच्या व पुढे टेनिसनच्या काव्यातही अशा धर्तीच्या काही कविता आढळतात. केशवसुतांपासून मराठीतील इतर अनेक कवींनीही या संकेताचा अधूनमधून आश्रय घेतला होता आणि त्या निमित्ताने जणू अन्तःकरणात दडपलेल्या आपल्या प्रणयी भावनांना वाचा दिली होती. ‘ जिने मला वेडा केले, तिच्यावरी ही फिर्याद ’ ही केशवसुतांची कवितेविषयीची कविता प्रसिद्धच आहे.

दत्तांच्या भावकवितेमध्येही हा चिमुकला प्रवाह मोठ्या उत्कट, वेधक स्वरूपात आढळतो. “ बघसी अन्त किती राजसे ” आणि “ प्रिये कवितासुंदरी ” या भावोत्कट कवितांमध्ये, त्यांनी कवितेवर प्रणयिनीचे आरोपण करून तिची आळवणी परोपरीने केली आहे. “ कुसुम-लालन ” या कवितेतही ते निसर्गात विखुरलेल्या फुलांना लडिवाळपणे आणि लगबगीने बोलावतात, कशासाठी, तर आपल्या कवितेच्या भेटीसाठी ! “ अंकावरि घेउनि तुम्हां कवितारमणी । कोकिलस्वराने गाइल मंजुळगाणी ” या ओळींमध्ये आपल्या कवितारमणीविषयीची त्यांची आत्मीयताच स्पष्ट होते. कविता हीच दत्तांची पहिली प्रेयसी होती. त्यांच्या अतृप्त अन्तःकरणाचे तेच पहिले प्रीतिस्थान होते म्हणूनच की काय, दत्तांची आंतरिक प्रेमभावना आणि रतिभावनाही कवितेलाच प्रेयसी मानून केलेल्या

त्यांच्या या आर्जवी काव्यात जशी व जितक्या उत्कटतेने जाणवते, तशी व तितकी ती त्यांच्या इतर मोजक्या प्रेमकाव्यांतही जाणवत नाही.

मात्र या स्वरूपाच्या दत्तांच्या कविताही केवळ सांकेतिक व अनुकरणप्रधान नाहीत हे आवर्जून सांगावयास हवे. त्यांत त्यांचे हृदयच प्रतिबिंबित झालेले स्वच्छपणे जाणवते. त्यांच्या 'असंतुष्ट' मनाला, कवितेमध्येच भावपूर्तीचे समाधान लाभत होते, हे जितके खरे, तितकीच कवितेबद्दलची त्यांची एकांतिक निष्ठाही खरी होती, जातिवंत व निसर्गसिद्ध होती. म्हणूनच 'प्रिये कवितासुंदरी' किंवा 'बघसी अंत किती राजसे' या त्यांच्या कवितेविषयीच्या कविताही केवळ सांकेतिकतेला ओलांडून, त्यांतील भावनेच्या सच्चेपणाचीच प्रचीती देतात. यांतील दुसऱ्या कवितेवर शेलेच्या 'Love's Philosophy' या सुप्रसिद्ध कवितेची छाया पडल्याचेही जाणवते. "प्रेमावांचुन निष्फल जीवित, ठावे तुजला असे, बघसी अन्त किती राजसे ?" या शब्दांत त्यांनी प्रेमाची महती आळवली आहे. आणि "काय करूं तुज पाहूं कोठे, तुजविण भरले पिसे, झुळझुळ वाहे प्रवाहजल हे एकसारखे जसे... माझे आयु चालले तसे !" या शब्दांत कविता-रमणीवाचून होणारी आपल्या व्याकुळ मनाची कासाविशीही वर्णिली आहे.

" जिच्याकरिता जन्म या जगीं झाला
जिच्यासंगें मम सर्व काळ गेला
तीच गेली सोडूनि मला आज
जगायाचे संपले अतां काज "

असा भावोत्कट प्रामाणिक आत्माविष्कारही याच कवितांमधून आढळतो.

'सख्या वसंतवाता' किंवा 'बाई लतिके !' अशा निसर्गपर काव्यांतूनही दत्तांच्या हृदयस्थ भावनांचाच आविष्कार झाला होता हे आपण यापूर्वीच पाहिले. 'लाडके', 'जा दृष्टीबाहेर', 'स्वप्नभेट', 'यत्रयत्र हरिणीदृशां क्रमः । तत्रतत्र मदनस्य विक्रमः', 'विनवणी' या त्यांच्या कवितांची गणना स्थूल मानाने प्रेमकाव्यात करता येईल. मात्र या काव्यांतही वैचित्र्य आहे. 'जा दृष्टीबाहेर' ही उत्कट, उत्स्फूर्त कविता, सरळसरळ आत्मनिष्ठ भावगीताच्या वाटेने जाते, तर 'लाडके' आणि 'स्वप्नभेट' या प्रेमकवितांवरही संस्कृत विप्रलंभ शृंगाराचा परिणाम जाणवतो. 'यत्रयत्र हरिणीदृशां क्रमः' ही सुरेख, रसीली कविता तर, शाहिरी काव्यातील लावणीच्याच पावलावर पाऊल टाकते. आणि 'विनवणी' या प्रेमगीतात एका व्याकुळ आणि तरीही विभ्रमचतुर अशा स्त्रीमनाचेच नेमके दर्शन घडते. या कवितांच्या भावाशयानुसार त्यांच्या भाषेचेही रूप पालटलेले दिसते.

खऱ्या भावकवितेतील उत्कट भावाशयाचा सच्चेपणा आणि अभिव्यक्तीमधील उत्स्फूर्त साधेपणा या गुणांमुळे 'जा दृष्टीबाहेर' हे त्यांचे भावगीत मोठे वैशिष्ट्यपूर्ण आणि हृदयंगम वाटते. भावनेची तीव्रता अंतर्भूत असली की, भावकवितेला इतर

आनुषंगिक व अप्रस्तुत गोष्टींची आवश्यकता नसते याचीच प्रचीती या कवितेत ठळकपणे येते. अंतर्मुखतेच्या आणि आशय व अभिव्यक्ती यांमधील एकरूपतेच्या दृष्टीने दत्तांच्या कवितेची वाटचाल भावगीताकडेच निश्चितपणे होऊ लागली होती याचीही मनोज्ञ साक्ष या कवितेमध्ये मिळते. त्यांच्या भाषेवरील संस्कृतचे सावटही या वेळी दूर होऊ लागले होते आणि ती अधिक सहजपणे मराठी वळण घेत होती, तिच्यातील कल्पनाही केवळ कल्पनाप्राचुर्यासाठी न येता, त्या भावाशयाशी एकरूप होऊन येत होत्या. 'जा दृष्टीबाहेर' या कवितेचा हा आरंभच पाहा– 'जा दृष्टिबाहेरुनि दुष्ट पोरी। राहू नको मन्नयनासमोरी। वाटे मनाला तुज घालवावे। कोरे फिरूनी हृदया करावे' या त्रुटित आखूड ओळी आणि भाषेची अकृत्रिम सहजता भावाशयाला खचितच पोषक ठरली आहे. 'ते हास्य ते, प्रणयसूचक हावभाव, ती लोल दृष्टी करी जी हृदयास घाव, ते गोडगोड तव भाषण सर्व काही, आटोप, नीघ, नलगे तव नांव तेही!' या उद्वेगपूर्ण आणि निर्वाणीच्या उद्गारांमध्ये पुढच्याच पिढीतील कवी गोविंदाग्रजांच्या प्रेमकवितेत आत्यंतिक उत्कटतेने प्रकट झालेल्या जीवघेण्या विफलतेची चाहूल प्रथमच येते यात शंका नाही! गोविंदाग्रज हे दत्तांपेक्षा वयाने कनिष्ठ, प्रेमाचे पहिले शाहीर म्हणून मान्यता पावलेले, त्यांच्या प्रेमकाव्यात विफल प्रीतीची जी हृदयस्पर्शी आर्तता दिसते, तिचे पहिलेवहिले प्रत्यंतर दत्तांच्या या प्रेमकाव्यात निःसंशय येते.

**" यत्रयत्र हरिणीदृशां क्रमः**<br>
**तत्रतत्र मदनस्य विक्रमः "**

हा संस्कृत श्लोक दत्तांच्या एका कवितेवर शीर्षकासारखा वापरला आहे. (या श्लोकाचा निश्चित कर्ता ठरविता आला नाही. तो कदाचित संस्कृत भर्तृहरि असू शकेल, किंवा स्वतः दत्तही असतील.) "तो आणि ती" यांच्यामधील संवादाचे रूप घेणारे दत्तांचे हे लावणीवजा नाट्यगीत मोठे आगळे आहे, त्याचा ढंगही वेगळाच आहे! (या गीतावर कै. वि. द. घाटे यांनी जी टीप दिली आहे ती अशी– "दत्तांचा कालिदासी शृंगार आधुनिक काव्यात अपूर्व आहे, तो उत्तान, अदम्य व खुल्या दिलाचा आहे.") हाडामासाच्या "हृदयशारदे"वर व्हावयाच्या प्रीतीच्या कविता दत्तांनी अदृश्य व भावरूपिणी कवितादेवीवर केल्या होत्या. या नाट्यगीतात मात्र निसर्गतः लाभलेला व कालिदास, भवभूती यांच्या गाढ परिचयाने अंगी मुरलेला सुभग शृंगार मोठ्या दिलखुलास, उमद्या स्वरूपात प्रथमच प्रकट होतो. "सहज चालता मार्गी तुजला बघता डोळे भरुन्। धरिले किति आवरुन् गेले मन माझे बावरुन्!" ही या गीताची सुरवातच पाहा. तिची न्यारी लज्जत आणि तिचा गोडवा वेगळा विशद करण्याची तरी आवश्यकता आहे का? "हंसापरि चालणे, पदर तो दोन्ही गुच्छांवरुन्। वरचेवर सावरून बघसी मान वाकडी करुन्" या ओळीतील स्वभावोक्ती रसिकमनांवरही कशी रमणीय प्रतिमा उठवते! या गीतातील अंतर्गत लय आणि प्रत्येक शेवटच्या

शब्दाचा पाय मोडल्याने त्या निसरड्या उच्चारांत सहजगत्याच निर्माण झालेली लचक आणि ढंग किती वेधक आहे! दत्तांच्या समकालिनांपैकी कुणाच्याही प्रेमकवितेत हा धीट पण नाजूक नखरा आढळणार नाही! परंतु आरंभी लावणीचा थाट मिरवणाऱ्या या गीताला पुढे जे वळण मिळते ते किती वेगळे आहे! या प्रणयव्याकुळ प्रियकराला त्याच्या साजणीने दिलेले उत्तर पाहा—

" प्राणसख्या, मी परकी नाही पडले दुरच्या दुरी
तुमची प्राणेश्वरी जाहले, बाण लागला उरीं
करमेना मुखचंद्र पाहिल्यावांचुनि प्राणेश्वरा
तुमचा मज आसरा, सख्या मी धरिले तुमच्या करां ! "

या " परक्या नारी "चे हृद्गत " बाण लागला उरीं " या नाटकी शब्दांपेक्षाही ' मी धरिले तुमच्या करां ! ' या साध्या शब्दांतच उत्कटपणे व्यक्त झाले आहे. या उद्गारांतील सहजता नकळताच मनाला भिडते आणि त्यांतूनच दत्तांच्या ठायी असणारी परचित्त प्रवेशाची किमयाही प्रकर्षाने जाणवते.

दत्तांच्या कविमनाची स्वाभाविक ओढ कारुण्याकडे होती याचे प्रत्यंतर त्यांच्या कितीएक कवितांमधून येते. म्हणूनच की काय कालिदासापेक्षा त्यांना भवभूती अधिक आवडे! ( मराठी रूपांतरासाठी त्यांनी भवभूतीकृत उत्तररामचरित् या नाटकाचीच निवड केली ही गोष्टही या दृष्टीने मोठी सूचक आहे. ) दत्तांच्या परमानंदाच्या, फार काय प्रणयगीताच्या लकेरीतही एखादा अस्फुट आर्त रव ऐकू येतो. कारुण्याची ही धूसर छाया त्यांच्या काव्यावर सर्वत्र पडलेली दिसते. ऐन तारुण्यात असे का व्हावे या प्रश्नाचे उत्तर कोण आणि कसे देणार ? सुजाण रसिकालाही कविमनात एका मर्यादेपर्यंतच डोकावता येते, परंतु या कारुण्याच्या, वैफल्याच्या पाठीमागे ' स्नेहावांचुन कोरडाच जळतो ' असे उद्गार काढणाऱ्या एका भावजीवी मनाचे आंतरिक एकाकीपण असावे यात काय शंका ? मघाशीच उल्लेखिलेल्या शाहिरी थाटाच्या प्रणयपर कवितेतही अखेरीस सूर निघतो तोही दुःखाचाच.

" ईश्वर माझे तुम्ही राजसा । मी तुमची पार्वती
येते काकूळनी मनींची दुःखें सांगू किती ? "

या शब्दांनी प्रणयाला स्त्रीहृदयाच्या अगतिक दुःखाची वेगळीच कलाटणी मिळते. ' येते काकूळनी ' या साध्या घरगुती शब्दांनी ती जिवाचा ठावही घेते.

संस्कृतप्राचुर्यात न्हाऊन निघालेली दत्तांची भाषा अशा भावकवितेत कसे साधे, सहजसुंदर वळण घेते हे खरोखर पाहाण्यासारखे आहे. त्या दृष्टीने ' मिश्रा नारायणा ' ही त्यांची कविता प्रेमकविता नसूनही सच्ची भावकविता म्हणून तिचा निर्देश येथेच

करावासा वाटतो. जिवलग मित्रापाशी ( कै. पैठणकर ) आपले भावपूर्ण हृदय खुले करताना ते म्हणतात,

**" कुठे तूं, मी कोठे, तुजमजमध्ये पर्वतकडे,**
**तरी माझे वेडे मन सतत धांवे तुजकडे "**

या साध्या, भावभऱ्या ओळीत उत्कट भावाशय कसा भरून राहिला आहे ! संस्कृत संकेतात आणि प्रौढ भाषेत दबलेली दत्तांची कविता खऱ्याखुऱ्या आधुनिक वळणाने कशी जाऊ लागली होती याचीही कल्पना या कवितेवरून येते. दत्तांच्या भाषेची ही पालटती रूपे मोठी वेधक आहेत !

**' असंतुष्ट पती ' या कवितेत,**

**" विद्या दावुं कुणा ? कुणा रसिकता दावूं ? कुणा चातुरी ?**
**केलेली कविता कुणास शिकवूं ? दावूं कुणा माधुरी ?**

इत्यादी ओळीओळींमध्ये उभी ठाकलेली प्रश्नचिन्हेच किती बोलकी आहेत ! कविमनात आणि त्याहूनही पुरुषी मनात, परिस्थितीच्या अनिवार्यतेचे, हतबलतेचे जे वादळ उठते ते शब्दांनून कसे व्यक्त होणार ? पण जे शब्दांनीही पुरेसे प्रकट होणार नाही, तेच या प्रश्नचिन्हांनी मात्र सांगून टाकले आहे. केशवसुतांच्या ' सतारीचे बोल ' या कवितेच्या शेवटी ' शांतच वारे, शांतच तारे, शांतच हृदयीं झालें सारें ' या ओळींत ' शांत ' या विशेषणाच्या पुनरुक्तीने जे साधले आहे तेच इथे या प्रश्नचिन्हांच्या पुनरुक्तीने साधले जाते. दत्तांच्या पिढीतील कवींमध्ये जो खरोखर दुर्मिळ तो शब्दांचा मितव्ययही त्यांच्या या भावकवितांतून विशेषत्वाने जाणवतो. ' मित्रा नारायणा ' या कवितेसारखीच किंबहुना तिच्याहूनही सरस अशी ' आगगाडीस ' ही साधी कविताच पाहा, अनुभवाच्या जुने-नवेपणापेक्षा किंवा लहानमोठेपणापेक्षाही त्या अनुभवाला कविमन कसे आत्मसात करते, त्या अनुभवाच्या तळाशी जाऊन तरल, सूक्ष्म भावछटाही स्वतःच्याच अंतर्मनात डोकावून कशा नेमक्या व समर्थपणे टिपते यातूनच सच्ची भावकविता निर्माण होते. प्रियजनांकडे जाण्यासाठी अधीर झालेले एक मन इथे आगगाडीची विनवणी करते आहे ' मानस माझे स्वेच्छाचारि, मला सोडुनी तव स्कंधावरि । जाऊन बसले केव्हांचे घरि '... या आरंभीच्याच ओळींमध्ये ' जाऊन बसले केव्हांचे घरि ' या साध्याच शब्दांनी कविमनात ओतप्रोत भरलेला भावाशय सहजगत्याच सामावून घेतला आहे आणि त्याहीपेक्षा,

**" जों जों जवळ घराच्या जातो,**
**तों तों अधिक उतावळ होतो**
**तव निर्जिवपण विसरूनि म्हणतो**
**वेड्यावेड्यापरी,**
**वाई नेईं – मला झडकरी "**

या शेवटच्या कडव्यातील ‘ वेडयावेडयापरी ’ या बोलीभाषेतील जिव्हाळयाच्या शब्दांनी वेडावून गेलेली सारी अधीरताच नकळत उतू गेली आहे! ‘ दीपका ’ ही आत्मपर कविताही अतीच सच्ची भावकविता आहे, कोणत्याही सांकेतिकतेपासून, कृत्रिमतेपासून दूर राहिलेली. या संवेदनाशील तरुण कवीच्या व्यथित मनातून नकळत उद्गार निघतात,

**‘ स्नेहाचा लवही मिळे न मजला, प्राणास कंटाळलो ’**

परंतु हे बोल उमटत असतानाच एकाएकी जाणवते,

**‘ स्नेहावांचुन कोरडाच जळतो– हे काय मी बोललों ? ’**

–आणि मग पोळलेल्या मनाला आठवण होते ती आईची, सखीची, परम– मित्राची !

**‘ कानीं हें पडतांच काय तुजला वाटेल आई बरें ?**
**वेड्याचे वच मानशील सखये । कैसे बरें तूं खरें ?**
**मित्रा ! तूं म्हणशील खास बनला वेडा तुझा सोबती,**
**बोला– काहि म्हणा वदून चुकलों आतां न त्याची क्षिती ! ”**

आईला, जीवसखीला, मित्रालाही हे एकाकीपण समजणार नाही, तीही बोल लावतील, पण बोलू दे त्यांना...जे आहे ते असे आहे, आणि तेच एकदा बोलून टाकल्यावर फिकीर करायची तरी कुणाकुणाची ? या विचाराने काही क्षण थांबलेले कविमनच जणू ‘ हे काय मी बोललो ’ या शब्दांपूर्वी जी अडवी रेघ दिली आहे, तिच्यावरच थांबून, थबकून राहिल्यासारखे वाटते ! शब्दांचा मितव्यय असावा तो असा ! आणि कवितेने कुठे थांबावे याचेही भान असावे ते असे ! खरे तर हे भान जाणीवपूर्वक नसतेही, कविमनाला ते आतूनच आकळलेले असते– निदान असावे.

**‘ एका आसन्नमरण दुष्काळपीडितास ’ या कवितेत**

**“ संपला येथला वास, सरला तव आयुप्रवास; शेवटी ”**

इथेही ‘ शेवटी ’ हा एकच शब्द दुसऱ्या ओळीच्या पुढे एखाद्या शकलासारखा वेगळा, तुटून पडला आहे आणि त्याच्यापुढे पूर्णविराम आहे. त्या एकाच अलग झालेल्या शब्दाने अर्थाची सघनता किती तीव्रतर झाली आहे ! ‘ विश्वामित्रीच्या काठीं ’ या कवितेतही सृष्टीच्या त्या घटकेच्या लावण्याचे वर्णन परोपरीने करून झाल्यावर ‘ वारंवार-कोठुनी असे दिसणार ? ’ या चारच शब्दांनी कवीला वाटणारी कृतकृत्यतेची, सार्थकतेची भावना नेमकी व्यक्त झाली आहे !

**“ झुळझुळ वाहे प्रवाहजल हे**
**एकसारखे जसे**
**माझे आयु चालले तसे...”**

येथेही पहिलीच्या मानाने आखुडलेल्या दुसऱ्या ओळीमध्ये, उघड्या डोळ्यांपुढे काहीतरी झिरपत, निसटत चालल्याची आणि ते अगतिकपणे पाहावे लागल्याची भावना नकळत संथपणे जाणवते...भावाशयाशी मिळून, मिसळून गेलेल्या भाषेच्या अशा लवचिकपणाची व मितव्ययाचीही काही ठळक उदाहरणे दत्तांच्या कवितेत आढळतात.

दत्त इतके अल्पायुषी ठरले नसते तर हा आत्मलक्षी, आत्मशोधक, प्रांजळ कवी कवितेच्या भाषेचे खरे आव्हान स्वीकारून कोणत्या दिशेने आपली वाटचाल करीत राहिला असता याची खरीखुरी साक्ष त्यांच्या ' असंतुष्ट पति ' या कवितेत मिळते.

' असंतुष्ट पति ' ही त्यांची महत्त्वपूर्ण आत्मनिष्ठ कविता तशी कोणत्याच वर्गात सामावणारी नाही, ते कवीचे मूर्तिमंत हृद्गत आहे. कदाचित सदैव हृदयातच दडपलेले अत्यंत जिव्हाळ्याचे मनोगत आणि अंतरंगात सलणारे शल्यही आहे. ते कळण्यासाठी दत्तांच्या जीवनाची व त्यांच्या कविमनावर झालेल्या संस्कारांची आठवण पुन्हा एकदा केली पाहिजे. दत्त नगरला, अमेरिकन मिशनऱ्यांच्या सहवासात आणि सुधारकी वातावरणात वाढले, विद्यापीठीय शिक्षणाचा लाभ त्यांना झाला, इंग्रजी व संस्कृतातील जुन्या-नव्या रसपूर्ण, भावोत्कट कवितेवर त्यांचा पिंड पोसला गेला. या सर्व वातावरणाचा आणि संस्कारांचा त्यांच्या मनोभूमिकेवर खोलवर ठसा उमटला असल्यास नवल नाही. त्यातूनच वैयक्तिक भावजीवनाविषयीच्या त्यांच्या आकांक्षाही वाढल्या; रमणीय स्त्रीत्वाची, स्त्रीप्रेमाची आणि खऱ्या सुसंवादी सहजीवनाची स्वप्नेही त्यांच्या डोळ्यांपुढे तरळत राहिली. परंतु या मनोमय स्वप्नभूमीपेक्षा प्रत्यक्षातले वास्तव फार वेगळे होते आणि ते व्यक्तीच्या अपरिहार्य मर्यादा आणि परिस्थितीचे निर्बंधही यांनी काचलेले होते. ते पालटणे, किंवा नाकारणे फार अवघड, किंबहुना अशक्यप्राय होते. दत्तांचे चिरंजीव कै. वि. द. घाटे यांनी यासंबंधी केलेले भाष्य मोठे बोलके आहे. आपल्या आत्मचरित्रात ते म्हणतात, ' आपल्या तुटपुंज्या बौद्धिक सामर्थ्याने दत्तांच्या तीव्र व वाढत्या बौद्धिक व काव्यपर आकांक्षा पुरविण्यास माझी आई असमर्थ होती. या असदृश मनोधर्मामुळे व वृत्तिविरोधामुळे दत्तांचे मन वास्तविकातून उडून जाऊन काल्पनिकात वावरू लागले. दत्त कवी, भावनाप्रधान, कालिदास, भवभूतीची पारायणे करणारे, ' गोल्डन ट्रेझरी ' उशाशी घेऊन निजणारे. वय कमी, अनुभव कमी, संयम कमी. अपेक्षा मोठ्या आणि घाई फार! गती जलद. धावत होते. चढत होते. नानी ( आई ) मागून येत होती. आपल्या चालीने, आपल्या गतीने. दमत होती, ठेचाळत होती. दत्तांनी तिला जाणले नाही. जाणण्याचे ते वयच नव्हते आणि जेव्हा जाणले तेव्हा उशीर झाला होता." दत्तांच्या चिरंजीवांनीच काढलेल्या या भावपूर्ण उद्गारांत या पतिपत्नींमधील विसंवादाचेच मर्म साठवले आहे. " विद्या दावु कुणा ? कुणा रसिकता ? दावूं कुणा चातुरी ? केलेली कविता कुणास शिकवूं ? दावूं कुणा माधुरी ? अंगी खेळुनि राहिला सुरस हा शृंगार दावूं कुणा ? " किंवा " संसारी मज गोवुनी, मज नको ऐसी दिली अंगना " या " असंतुष्ट पति " या त्यांच्या कवितेतील सुस्पष्ट आणि भेदक उद्गार केवळ त्यांच्याच नव्हे तर बालविवाहासारख्या रूढींचा बळी ठरलेल्या त्या पिढीच्याच अतृप्त भावजीवनावर प्रकाश टाकतात. साहजिकच दत्तांच्या जीवनात, " स्नेहाचा लवही मिळे न मजला, प्राणांस कंटाळलो । " हे त्या निराशेचेच अटळ पर्यवसान झाले.

दत्तांच्या ज्या भावकविता आज आपल्यापुढे आहेत, त्या आरंभीच उल्लेखिल्या-

प्रमाणे अगदी मोजक्याच आहेत. त्यांनाही अनेक मर्यादा पडलेल्या होत्या हे नाकारण्याचीही आवश्यकता नाही. या मर्यादांचा उगम काही अंशी तत्कालीन परिस्थितीमध्ये, तर काही अंशी कवीच्या नवथर व्यक्तिमत्त्वाच्या अप्रगल्भतेमध्येही होता. प्रेमभावनेचे सच्चे आणि उत्कट आत्मलेखन, प्रीतीलाच दिलेले जीवनमूल्याचे स्थान, आणि मानसिक, आत्मिक पातळीवरील या भावनेची प्रचीती याचा पुरेसा प्रत्यय दत्तांच्या या मोजक्या भावकवितांमधून येत नाही. परंतु पुढील काळात विकसित झालेल्या सच्च्या भावकवितेची चाहूल मात्र त्यांतून स्पष्टपणे लागते.

समकालीन कवितेच्या पार्श्वभूमीवर पाहिले तरीही दत्तांच्या प्रेमकवितेला अनेक अपरिहार्य मर्यादा पडतात. त्या जशा नाकारता येणार नाहीत, तशीच दत्तांच्या अल्पायुष्याची कठोर मर्यादाही विसरता येणार नाही. प्रणय आणि शृंगाराची मर्यादा ओलांडून प्रीतीचा मानसिक पातळीवरील आविष्कारही त्यांच्या काव्यात क्वचितच आढळतो. एखाद्या कवितेत त्याची चाहूल लागते. परंतु ऐन उमेदीत येण्यापूर्वीच ज्याचा अंत झाला, त्याच्या भावकाव्यातही त्याच्या व्यक्तिमत्त्वाचा परिपूर्ण आणि सकस आविष्कार कसा दिसावा ! दत्तांना आपले वैशिष्ट्य, आपले स्वत्व आणि आधुनिक कवितेची खरी आधुनिकता जाणवून त्यांनी ‘ स्व-भावगीतरचनेस ’ आरंभ केला न केला तोच त्यांच्या जीविताला पूर्णविराम मिळाला. नवथर तारुण्यातले प्रेम अनेकदा प्रेमकल्पनेवरच विसंबलेले असते आणि सृष्टी किंवा कविता यांचे निमित्त करून त्यांच्या माध्यमातूनही ते आडवळणाने व्यक्त होऊन पाहाते, जसे ते राधाकृष्णाच्या बुरख्याआडूनही व्यक्त होत असे. या संकेताचे स्मरणही येथे होते. म्हणूनच काही थोडे अपवाद सोडल्यास, त्यांच्या उत्कट प्रेमभावनेचे खरे व पूर्ण आविष्करण त्यांच्या प्रेमकवितांतही क्वचितच आढळते. इंग्रजी प्रेमगीते वाचल्यानंतर निर्माण झालेल्या प्रेमविषयक आकांक्षांची परिपूर्ती स्वतःच्या जीवनात होऊ न शकल्याने जी प्रेमनिराशा व अतृप्ती अनुभवावी लागली, तिचेच पडसाद स्वाभाविकपणे दत्तांच्या काव्यात अधिकांशाने उमटले. मात्र हीच प्रेमभावना क्वचित खऱ्या आवेगाने, संकेतांना आणि कल्पनाप्राचुर्याला बाजूला सारून सरळपणे व्यक्त होते, तेव्हा ती मनाचा ठाव घेतल्यावाचून राहात नाही. ‘ लाडके ’ या त्यांच्या प्रेमकवितेत चिरवियोगाचे दुःख असेच आवेगाने व्यक्त झाले आहे. ही कविता पंडित जगन्नाथ यांच्या संस्कृत काव्याच्या थाटाची आहे. परंतु तिच्यात केवळ कल्पनेचा विलास नाही तर शोकाचा हृदयस्पर्शी आवेग आहे. “ संसाराटवी एकला फिरुं कसा अंधार चोहीकडे । ये ये धावुनि लाडके मुखशशी दावीव आता गडे ! ” हे उद्गार याचीच साक्ष देतात. दत्तांच्या मोजक्याच भावकवितांचा आणि ज्या भाषेतून त्या व्यक्त झाल्या त्या भाषेचाही विचार येथे काहीसा विस्ताराने केला, तो एवढ्याचसाठी की संस्कृत संकेतांच्या आणि परंपरेच्या प्रभावातूनही आधुनिकता व नवता यांच्या सूक्ष्म खुणा या कवितांतून विखुरलेल्या दिसतात त्यांची दादही मराठी रसिकांनी सुजाण मनाने घ्यावी आणि या अल्पायुषी कवीची केवळ उपेक्षा होऊ नये।



# समारोप



दत्तांच्या व्यक्तिमत्त्वाची जडणघडण कोणत्या काळात, कोणत्या संस्कारांमध्ये झाली, त्यांतूनच त्यांच्या कवित्वाचे बीज कसे विकसित झाले, हे आपण आरंभीच पाहिले. कोणत्याही कलावंताची निर्मिती साकल्याने, एकात्म दृष्टीनेच पाहाणे आवश्यक असते. परंतु विवेचनाच्या सोयीसाठी दत्तांच्या कवितेची स्थूल स्वरूपाची काही विभागणीही करावी लागली. या कवितेचे स्वरूप आणि तिचे वैशिष्ट्य काय होते, तिची गुणवत्ता आणि तिची मर्यादा या दोहोंचा उगम सभोवतीच्या परिस्थितीमध्ये, तसाच दत्तांच्या कविमनावरील संस्कारांमध्ये आणि त्यांच्या व्यक्तिमत्त्वामध्येही कसा होता याचे विवेचन करण्याचा प्रयत्न येथवर केला. या विवेचनाचा समारोप करताना त्यातूनच निर्माण होणाऱ्या काही महत्त्वाच्या प्रश्नांचा विचार आता करावयास हवा; दत्तांचे दत्तपण नेमके कशात होते, याचाही शोध घ्यावयास हवा.

दत्तांचा जन्म झाला तोच एका संक्रमणकाळामध्ये ! या देशाच्या व महाराष्ट्राच्याही समाजजीवनातील नवप्रवर्तनाचा आणि प्रबोधनाचा हा उषःकाल होता; आणि जुन्या, नव्या संस्कारांच्या दृष्टीने पाहिले तर तो एक संधिकालही होता. दत्तांचा जन्म झाला तेव्हा इंग्रजी राज्य या देशात बद्धमूल आणि सुप्रतिष्ठित होऊनही काही दशके उलटली होती. इंग्रजी राज्यकर्त्यांनी आपल्याबरोबरच नव्या सुधारणांचे, शिक्षणाचे, वाङ्मयाचे, किंबहुना एका प्रगत, आधुनिक संस्कृतीचे वारेही या देशात आणले होते. त्याचा प्रभाव नवशिक्षितांवर हळूहळू पडू लागला होता. नवजागृतीची चिन्हेही समाजात दिसू लागली होती. नवतेचे वारे कसे आणि कुठून का होईना, जेव्हा समाजजीवनामध्ये शिरते, तेव्हा त्या जीवनाच्या एखाद्याच क्षेत्रापुरते ते मर्यादित राहात नाही; त्याचा सर्वांगीण संचार होऊ लागतो आणि नव्या स्थित्यंतराची, संक्रमणाची भलीबुरी चिन्हे हळूहळू समाजाच्या अंगोपांगांमध्ये उमटू लागतात. समाजाच्या मूलगामी मनोवृत्तीमध्ये आणि दीर्घकालीन संस्कारांमध्ये झपाट्याने, आमूलाग्र बदल होतो असे नाही कारण त्यांची पाळेमुळे फार खोलवर रुजलेली असतात, परंतु प्रतिगामी रूढी आणि गतानुगतिक

मनोवृत्ती यांच्याविरुद्ध मनानेच बंड करून उठणाऱ्या नवशिक्षितांची, नव्या दमाची, नव्या उमाळ्यांची एक पिढी, हळूहळू तयार होऊ लागते, आणि त्यांच्याठिकाणी अंकुरलेल्या नव्या जाणिवेची प्रसादचिन्हे सामाजिक, सांस्कृतिक जीवनाच्या अनेकविध क्षेत्रांमध्ये उमटू लागतात. दत्तांचा कालखंड हा अशा नव्या जाणिवेचा कालखंड होता. सामाजिक सुधारणा, शिक्षण, वाङ्मय अशा अनेक क्षेत्रांमध्ये ही नवी जाणीव निश्चित स्वरूपात निर्माण झाली होती, इतकेच नव्हे, तर तिला गती येऊन ती प्रत्यक्ष कार्यान्वितही होऊ लागली होती. १८७४ मध्ये विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी केलेली 'निबंधमाले'ची सुरवात हा या सामाजिक आणि वाङ्मयीन प्रवर्तनाचा मोठा लक्षणीय असा आरंभच होता! पाश्चिमात्य संस्कृतीच्या आणि सुधारणेच्या या सर्वांगीण संपर्कामध्ये इंग्रजी साहित्याचा आणि काव्याचाही वाटा फार मोठा होता. अर्थात जे संक्रमण अवघ्या समाजजीवनात घडू पाहात होते त्याला केवळ पाश्चिमात्यांचा परिणामच जबाबदार नव्हता. परंपरेशी आणि प्रतिगामी, पुरातनी मनोवृत्तीशी शतकानुशतके जखडल्या गेलेल्या आपल्या वैयक्तिक आणि सामाजिक जीवनाविषयीच एक प्रबळ असंतोष या नवशिक्षित तरुण पिढीमध्ये निर्माण झाला होता. त्या असंतोषाबरोबरच, नव्या प्रगतिपर सुसंवादी जीवनाची आकांक्षाही त्यांच्या अंतर्यामी साहजिकच जन्म घेत होती. सर्वांगीण परिवर्तनासाठी त्यांची मनोभूमी हळूहळू सिद्ध व उत्सुक झाली होती. आपल्या निबंधमालेमधून आणि अनेक सामाजिक उपक्रमांमधून विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी आणि इतर समाजधुरीणांनी राष्ट्रीय अस्मितेची नवी जाण आणि कृतिशील प्रेरणाच समाजामध्ये निर्माण केली आणि त्याच अस्मितेचा उज्ज्वल विकास पुढे लोकमान्य टिळकांच्या कार्यातून झाला. कविता, कादंबरी, नाट्य, निबंध अशा विविध वाङ्मयप्रकारांमधून या स्थित्यंतराच्या खुणा जाणवू लागल्या. काव्यक्षेत्रात केशवसुत, कादंबरीमध्ये हरी नारायण आपटे, नाटकामध्ये किर्लोस्कर देवल, आणि निबंधामध्ये विष्णुशास्त्री चिपळूणकर, गोपाळ गणेश आगरकर इत्यादी ठळक नावे येथे आवर्जून घ्यावी लागतील. सामाजिक जीवनातही नव्या विचारधारा निर्माण होऊ लागल्या आणि बालविवाह, अस्पृश्यता, केशवपन इत्यादी जुनाट रूढींविरुद्ध मुकाबला करतानाच, स्त्रीशिक्षण, व्यक्तिस्वातंत्र्य अशा नव्या सुधारणांची आणि विचारांचीही बीजे समाजामध्ये रुजू लागली. दत्तांचे कर्तृत्व अर्थातच प्रामुख्याने काव्यक्षेत्राशी निगडित होते. या क्षेत्रामध्ये केशवसुतांना 'कवींचे कवी' हा अग्रमान मिळाला.

दत्त केशवसुतांचे चेले किंवा अनुयायी नव्हते, काव्यदृष्टीने पाहाताना, संप्रदाय असलाच तर तो मात्र दोघांचा एकच होता. केशवसुतांची काव्यविषयक जाणीव निश्चितच अधिक प्रबळ, समर्थ व दूरगामी होती. त्यांचा पिंडही द्रष्ट्या विचारवंताचा होता, तर दत्तांची कविप्रकृती सौंदर्यासक्त भावकवीची होती. या दोन कवींच्या व्यक्तिमत्त्वांमधील हा मूलभूत फरक अर्थातच दृष्टिआड करता येणार नाही.

केशवसुतांच्या निधनानंतर जी पिढी काव्यप्रांतात आली, ती मात्र केशवसुतांच्या क्रांतिकारकत्वाने अधिकच प्रभावित झाली, वास्तविक गोविंदाग्रजांसारख्या प्रतिभासंपन्न

उत्तरकालीन कवींची कविप्रकृती केशवसुतांपेक्षा मूलतःच वेगळी होती. समर्थ आणि स्वयंभू होती. आणि तरीही कवी रेंदाळकरांच्याच शब्दांत सांगावयाचे तर, " आहे साथ करावयास बसलो, राहून मागे तुझ्या ! " अशीच विनीत भूमिका कवी भास्कर रामचंद्र तांबे आणि कवी ' बी ' ( नारायण मुरलीधर गुप्ते ) यांचे अपवाद वगळता या सर्व कवींनी कमी–अधिक प्रमाणात स्वीकारली ! गोविंदाग्रज आणि बालकवी या स्वतंत्र प्रतिभेच्या श्रेष्ठ कवींनीही आपल्या सामाजिक काव्यांतून केशवसुतांचे काहीसे अनुकरण केलेच, परंतु केशवसुतांची कविता त्यांचे समकालीन असणाऱ्या दत्तांना मात्र प्रेरक किंवा स्फूर्तिदायी ठरल्याचा विश्वासार्ह पुरावा आज आढळत नाही. १९ व्या शतकाच्या या अखेरच्या पंचविशीत, ज्या स्वागतशील कविमनात कवितेचे हे नवे वळण रुजले आणि वाढीस लागले, त्याची काही ठळक वैशिष्ट्ये या पिढीतील मराठी कवींच्या काव्यात कमी-अधिक स्वरूपात जाणवतात. ही वैशिष्ट्ये नेमकी कोणती होती ? भावकाव्यातील आत्म-लेखन, व्यक्तिस्वातंत्र्यावरील दृढ विश्वास, रूढी, संकेत व परवशतेचा तिरस्कार, निसर्गाकडे पाहाण्याचा नवा सचेतन दृष्टिकोण आणि आशय व अभिव्यक्ती यांच्या एकात्मतेनुसार कवितेच्या भाषेला व रचनेला दिलेले नवे स्वतंत्र वळण ही या नवतेची काही महत्त्वाची लक्षणे. या वैशिष्ट्यांचा प्रत्यय दत्तांच्या समग्र काव्यात निःसंशय येतोच, याखेरीज त्यांची स्वतःची काव्यदृष्टीही ' प्रगती आणि काळ ' यांच्या अनुरोधाने पालटत होती, विकसत होती याचेही प्रत्यंतर त्यांच्या काव्यविषयक विचारांत आढळते. दत्तांच्या काव्यात प्रतीत होणाऱ्या या नव्या जाणिवेचा उगम कोठे असलाच तर तो त्यांच्या स्वतःच्याच बहुविध संस्कारांमध्ये, इंग्रजी व मराठी वाङ्मयाच्या परिशीलनामध्ये आणि त्यांच्या काव्यात्म व्यक्तिमत्त्वामध्ये होता. म्हणूनच कोणत्याही पूर्वकालीन किंवा समकालीन कवीशी त्यांचे नाते हटातटाने जोडता येणार नाही असे आज जाणवते.

" काव्यरत्नावली " या मासिकाचे संपादक ना. कृ. फडणीस यांना आपला काव्यविषयक दृष्टिकोण कळविताना दत्तांनी काढलेले उद्‌गार आपण यापूर्वीच पाहिले आहेत. प्रगती व काळ यांच्या अनुरोधाने कवितेची सुधारणा झाली पाहिजे असे आपले पुरोगामी मत स्पष्टपणे मांडतानाच, अर्वाचीन मराठी कवितेने आत्मसात करावयास हवीत अशी काही वैशिष्ट्येही त्यांनी उल्लेखिली आहेत. " मनोविकारांचे चित्रलेखन " हे त्यांतील एक महत्त्वाचे वैशिष्ट्य होय. प्रामाणिक व उत्कट आत्मलेखनाची चाहूल दत्तांच्या कवितेत आपल्याला निःसंशय येते. त्यांचे निधन झाले तेही इतके अकाली की, अशा समर्थ व पक्व जाणिवेचे आणि काव्यजीवनविषयक निश्चित दृष्टिकोणाचे भक्कम अधिष्ठानही त्यांच्या व्यक्तिमत्त्वाला लाभण्यास पुरेसा अवसर मिळाला नाही ! परंतु भावकवितेमध्ये स्वतःच्या आणि इतरांच्याही भावभावनांचे, मनोविकारांचेही निखळ प्रतिबिंब उमटले पाहिजे ही जाणीव त्यांना होती. त्यांच्या काव्यामध्ये येणारे तिचे प्रत्यंतर आजही रसिक वाचकाला जाणवल्यावाचून राहाणार नाही.

दत्तांचा नैसर्गिक पिंड हा सुखदुःखांनी भरलेले हे जीवन उत्कटपणे जगणाऱ्या

आणि मनाला भिडणाऱ्या प्रत्येक भावानुभवाशी ममत्वाने एकरूप होऊन आपल्या काव्यामध्ये त्याचे चित्रलेखन करणाऱ्या जीवनप्रेमी आणि सौंदर्यासक्त भावकवीचा होता. नियतीने वाट्याला आलेले हे जीवन उत्कटपणे जगत असताना, जे जे भावानुभव त्यांना आले किंवा आपल्या तरळ, सहृदय कल्पनाशक्तीच्या साहाय्याने जे अनुभव त्यांनी मनोमन घेतले, त्या सर्वांचेच मोठे निर्मळ प्रतिबिंब त्यांच्या काव्यात पडले आहे. भावगर्भ शब्दांच्या किमयेने हळूहळू सजीव, साकार होत जाणाऱ्या या अनुभवरूपाशी आणि त्यातील भावस्थितीशीही ( Emotional Mood ) पूर्णांशाने एकरूप होण्याची, जणू स्वतः ते जगण्याचीच एक असाधारण शक्ती दत्तांच्या काव्यात्म व्यक्तिमत्त्वामध्ये होती. अशा वेळी त्यांची भावना, कल्पना, भाषा सारेच त्या अनुभवरूपाशी एकतानता साधत असे. स्वतःला आवरून, हातचे राखून कोणत्याही अनुभवाचा शोध घेणे किंवा समरस होणे दत्तांच्या प्रतिभेलाच नव्हे, तर त्यांच्या मनोवृत्तींनाही मंजूर नव्हते. कदाचित अनुभवाच्या आवर्तात स्वतःला बेगुमानपणे झोकून देणाऱ्या त्यांच्या मनस्वी तारुण्याचाही तो नैसर्गिक गुणधर्म असेल ! त्यांच्या या तरल, कल्पक मनोधर्मामुळेच की काय, कोणत्याही अनुभवाचे रूप त्यांच्या अंतर्दृष्टीपुढे साक्षात उभे राही. म्हणूनच की काय, दत्तांच्या भावकवितेत मनोविकारांचे केवळ लेखन आढळत नाही, तर " चित्रलेखन " आढळते ! इंग्रजी भावगीतांच्या अनुकरणाने व परिणामाने प्रेममाहात्म्य, प्रेमाचे प्रथमपुरुषी आत्मलेखन, निसर्गसौंदर्य, निसर्गाची आणि मानवाची तुलना, राष्ट्रभक्ती इत्यादी नव्या विषयांचा प्रवेश मराठी काव्यात झाला होता. दत्तांनी आपल्या काव्यात जे विषय हाताळले, तेही त्या काळाला अनुरूप असेच होते. परंतु हे जुने, नवे विषय हाताळताना, भावना व कल्पना यांचा सुसंवाद साधतसाधत, ज्या भावपूर्ण व कल्पक स्वरूपात त्यांनी या अनुभवांचा आविष्कार केला, पंचेंद्रियांच्या संवेदनांनी जणू त्या अनुभवरूपाला सौंदर्यमय व सचेतन केले, त्यामध्येच दत्तांच्या प्रत्ययकारी जाणिवेची मनोज्ञ साक्ष मिळते. दत्तांनी ज्याला मनोविकारांचे चित्रलेखन असे संबोधिले त्यालाच आपण आज, मानवी भाववृत्ती साकार करण्यासाठी केलेले प्रतिमाचित्रण असे यथार्थपणे म्हणतो, आणि कोणत्याही भावानुभवाचा थेटवर वेध घेणाऱ्या, त्याला समूर्त करणाऱ्या नव्या समृद्ध प्रतिमांमधूनच नवे काव्य निर्माण झाले असे मानतो.

प्रतिमा व प्रतीकांची ही भाषा आधुनिक असली, नवी वाटली, तरी तिची बीजे जुन्या काव्यातही दिसतात. तिच्या खुणा जुन्या काव्यातही उमटलेल्या आढळतात. फार मागे न जाता, केशवसुतांसकट दत्तांच्या समकालीन कवींची कविता या दृष्टीने पाहाताना मनोविकारांचे हे चित्रलेखन किंवा प्रतिमालेखन दत्तांच्या अल्प स्वल्प कवितेतही जितक्या स्पष्टपणे, उत्कटपणे जाणवते, तसे ते इतरत्र जाणवत नाही. म्हणजेच आधुनिक कवितेच्या नव्या वळणाची जी ठळक वैशिष्ट्ये दत्तांच्या काव्यात स्वतंत्रपणे आढळतात, त्यांत मनोविकारांचे हे चित्रलेखन सर्वांत महत्त्वाचे होय. हे चित्रलेखन अर्थातच स्वतःच्याच भावभावनांचे नव्हते, तर परचित्तप्रवेशाने आत्मसात झालेल्या

इतरांच्याही मनोविकारांचे, व भावानुभवांचेही होते. अर्वाचीन मराठी काव्यातील नवप्रवर्तनाची अशी ठळक साक्ष, वयाची पंचविशीही न ओलांडलेल्या या तरुण कवीच्या काव्यात निखालसपणे मिळते. ‘ निज नीज माझ्या बाळा ’ हे काव्य या दृष्टीने त्यांच्या मोठेपणाचेच एक गमक ठरते; परंतु ‘ तरुवरा ’, ‘ आगगाडीस ’, ‘ दीपका ’ या त्यांच्या भावकविताही मनोविकारांचे चित्रलेखन उत्कटपणे करतात. कृतज्ञता, उत्कंठा व आंतरिक एकटेपणातुन निर्माण होणारे मानसिक विकल्प या भावनाप्रधान मनात उगम पावणाऱ्या मनोभावनांना साकार करताना, ‘ दत्तांनी ’ ‘ झाड, आगगाडी व दीपक ’ या समर्पक प्रतिमांची योजना केली आहे. या अनुरूप व भाववाही प्रतिमांच्याच माध्यमातून आपल्या भावना त्यांनी सजीव व प्रत्ययकारी केल्या आहेत; आधुनिक भाषा वापरायची तर असेही म्हणता येईल की, या प्रतिमा कवीच्या आंतरिक भाववृत्तीने उजळून निघाल्या आहेत. ‘ दीपका ’ ही सुंदर कविता या दृष्टीने पाहिली तर अनुभवाला बोलक्या करणाऱ्या, नव्हे निर्मळ पाण्याने वनश्रीला जवळ घ्यावे तसे अनुभवरूपाचेच नितळ प्रतिबिंब दाखविणाऱ्या उत्कट प्रतिमेमुळे समृद्ध झालेल्या भावकवितेचे ते एक आदर्श उदाहरणच ठरेल ! या कवितेतील कवीचा आत्माविष्कार जितका कलात्मक आणि उत्स्फूर्त, तितकाच जिवंत आणि बोलका आहे.

भावप्रवणता हे कवित्वाचे एक नैसर्गिक लक्षण, परंतु दत्तांच्या कवितेत या भाव-प्रवणतेला एक वेगळा अर्थ आणि निराळे परिमाण मिळाले आहे. पाश्चात्त्य संस्कृतीशी झालेल्या नव्या संपर्कामुळे आणि इंग्रजी रोमँटिक काव्याच्या वाचनामुळे दत्तांच्या काळातील सुविद्य, सुसंस्कृत तरुणांमध्ये एक वेगळीच भावनाप्रधान आणि सौंदर्यप्रेमी वृत्ती निर्माण झाली होती. दत्तांची बरीच कविता या वृत्तीनेच मंडित झाली आहे, आणि निसर्ग, कविता व प्रीती यांविषयीचे त्यांचे असाधारण आकर्षण व कुतूहलही यांमधूनच जन्माला आले आहे. त्यांच्या मोजक्याच भावकवितेमध्येही ज्या उत्स्फूर्ततेचा आणि ताजेपणाचा प्रत्यय येतो, त्याचे गमकही त्यांच्या नवतारुण्यापेक्षा त्यांच्या या विशिष्ट मनोवृत्तीमध्येच आहे.

सरळ सीधेपणाने केलेल्या प्रांजळ आत्माविष्कारामधूनही भावकवितेला एक निश्चित बळ लाभते, परंतु प्रतिमा-प्रतीकांच्या क्षणचित्रांतून भावस्थितीचे स्पंदन जाणवले म्हणजे त्या अनुभवरूपालाच कितीतरी अधिक परिमाणे लाभतात याची अंगभूत जाण, दत्तांच्या मोजक्याच कवितांमध्ये दिसते. याचा अर्थ, त्यांची कविता जाणीवपूर्वक काही प्रतिमांचा किंवा रूपकांचा आश्रय करते असे नाही. रसिकाला अंतर्यामी जाणवते ती या प्रतिमां-मधून, कळीचे फूल व्हावे तितक्या सहजपणे साकार झालेली भावस्थिती आणि कविमनाने तिच्याशी साधलेली संपूर्ण एकरूपता ! बालकाचे मन ज्या सहजपणे सभोवतीच्या वस्तुजाताशी एकरूप होते, त्याच सहजतेने दत्तांची कविता, आपल्या व सभोवतीच्या भावविश्वाशी आणि निसर्गाशीही तादात्म्य पावते. म्हणूनच की काय, त्यांच्या कविमनाच्या नंदनवनात निसर्गरूपांनाही सचेतन अस्तित्व आणि लाघवी लडिवाळ

व्यक्तिमत्त्व लाभते! त्यांची कविताही या नंदनवनात कवितारमणी बनते, राजस प्रिया होते आणि कवी तिचेच भावार्त आराधन करू लागतो. दत्त नखांनी चित्रे काढण्याची कलाही शिकले होते असे म्हणतात, म्हणूनच की काय त्यांच्या काव्यात प्रतिबिंबित झालेली त्यांची भावसृष्टीही नखांनी काढलेल्या चित्रासारखीच वाटते यात काय आश्चर्य! मनोविकारांचे चित्रलेखन करणारी दत्तांची ही प्रतिभा स्वभावतःच नाट्यात्म आहे, विशिष्ट अनुभवाच्या, प्रसंगाच्या गाभ्याशी असणारे नाट्य अचूक टिपणारी आहे याचे प्रत्यंतर ' बा नीज गडे ' या त्यांच्या अंगाईगीताप्रमाणेच इतर अनेक कवितांमध्ये येते.

दत्तांच्या काव्यातील ही स्वप्नसृष्टी मात्र सभोतीच्या वास्तव सृष्टीलाच बिलगलेली आहे. परचित्तप्रवेशाची किमया साधून दत्तांचे कविमन स्वतःच्याच नव्हे, तर सभोतीच्या जीवनातील अनेक भावानुभवांशी सारखेच समरस, किंबहुना एकरूप झालेले दिसते. आश्चर्य असे की, कविवर्य तांब्यांप्रमाणेच, दत्तांच्या कविमनाचे हे तादात्म्य स्त्रीमनाशी अधिक उत्कटतेने झालेले जाणवते; फार काय, दत्तांच्या मोजक्या, सुंदर शिशुगीतांकडे पाहिले तरीही याचीच प्रचीती येते. ' शहाणी बाहुली ', ' बोलत का नाही ' आणि ' अ आ ई ' या तिन्ही बालगीतांमध्ये एका लाघवी, लडिवाळ बालिकेचेच मन दत्तांनी समरसून व्यक्त केले आहे. त्यांच्या समग्र काव्यातील " विनवणी ", ' एका मद्यप्याची स्त्री ', ' मेनका शकुंतलेस काय म्हणते ? ', ' निज नीज माझ्या बाळा ' या कविता पाहिल्या तरी त्यांतही, विरोधी परिस्थितीच्या चक्रात सापडलेल्या स्त्रीमनाचीच अगतिकता व कारुण्य यांचेच प्रत्यंतर येते. ' यत्रयत्र हरिणीदृशां क्रमः ' या प्रणयपर कवितेतील नायिकाही ' तुमचा मज आसरा, सख्या, मी धरिले तुमच्या करा! ' असे विश्वासक उद्गार काढते तेव्हा असहाय स्त्रीमनाची आधाराची अपेक्षाच त्यातून सहजगत्या व्यक्त होते आणि " एका मद्यप्याची स्त्री " या कवितेतील स्त्री आपल्या पतीला विनवताना, " सवती आम्हा मरणासम " असे उद्गार काढून पदर पसरते तेव्हा त्यातून अस्सल स्त्रीमनच व्यक्त होत नाही काय? परंतु या हतबलतेमध्येही स्त्रीचे मनोबल आणि श्रद्धा मात्र अभंग राहिल्याचेच दत्तांनी आपल्या कवितेत दाखविले आहे. म्हणूनच दुष्यंताने अव्हेरलेल्या शकुंतलेचे सांत्वन करताना " होईल सत्याचा जयघोष, हा संतोष मानुनि घे, ' असेच मेनका तिला समजावते आणि " बा नीज गडे " या अंगाईगीतातील दुर्दैवी, दरिद्री आईही " परि सोडू नको सत्याला, भावें भज दीनदयाळा, मग रक्षिल तो करुणासागर तुजला " असाच विश्वास त्या निर्वाणीच्या परिस्थितीतही आपल्या चिमुकल्या बालकाला देते! दत्तांच्या या समरसतेचा उत्कर्षच ' बा नीज गडे ' या अमर अंगाईगीतात झाला आहे. त्याचा आस्वाद स्वतंत्रपणे घेतल्यावाचून दत्तांच्या काव्याचा हा परामर्शच अपुरा राहणार आहे.

मराठी कवितेच्या आस्वादकांनी एकमुखाने वाखाणलेल्या दत्तांच्या या करुण गीताच्या तोडीचे गीत मराठी कवितेत आजही खरोखरच दुर्मिळ आहे. या काव्यात व्यक्त झाले आहे एका दरिद्री पण वत्सल आईचे भावार्द्र मन, एका स्वाभिमानी सश्रद्ध

आईचे मन ! या दुर्दैवी आईनेही कधीकाळी सुखाचे, वैभवाचे दिवस पाहिले होते. पण ग्रहदशा पालटली, ती अनाथ झाली, दारिद्र्याने घरात वसती केली ! आज ती जगत आहे, केवळ आपल्या चिमुकल्या बाळासाठीच !

दत्तांचे हे अंगाईगीत वाचताना नेहमीच गोविंदाग्रजांच्या "राजहंस माझा निजला" या कवितेची आठवण होते ! दोन कलाकृतींची आणि त्याहूनही दोन प्रतिभावंतांची तुलना करणे अनेकदा अवघड, किंबहुना अन्यायकारकही ठरते. कारण त्यांची शक्तिस्थाने आणि त्यांच्या मर्यादाही भिन्नभिन्न असतात, त्या त्यांच्या स्वतंत्र व्यक्तिमत्त्वामधूनच अपरिहार्यपणे उद्भवलेल्या असतात. दत्त आणि गोविंदाग्रज यांच्या या दोन कवितांमधील साम्य जाणवते याचे कारण, दोन्ही कविता म्हणजे एका दुर्दैवी आईचेच मनोगत आहे. "राजहंस" मधील आई 'दुर्दैवनगाच्या शिखरीं असणारी नवविधवा दुःखी आई' आहे. तिचा शोक अधिक दारुण आणि अधिक भडक आहे. वैधव्याच्या व पुत्रनिधनाच्या दुहेरी आघातांनी ती काहीशी भ्रांत झाली असली तरीही तिच्या मुखात कल्पनेच्या ज्या भराऱ्या कवीने घातल्या आहेत त्या संवेदनाशील वाचकाला भोवळ आणल्यावाचून राहात नाहीत ! या कल्पना स्वतंत्रपणे सुंदर असल्या तरी या कवितेच्या भावाशयाशी त्या एकरूप होत नाहीत, काव्यात्म वाटत नाहीत, किंबहुना कृत्रिम आणि विसंगत वाटतात. इथे ती दुर्दैवी नवविधवा आई बोलत नसून स्वतः कल्पनाचतुर कवीच बोलत आहे अशी वाचकांची भावना होते. 'राजहंस' मधील कल्पनांचा हा झगझगाट दत्तांच्या कवितेत नाही. दीर्घकाळ सोसलेल्या दुःखांनी व आपत्तींनी या आईच्या दुःखाला एक संयत, सोशिक संथपणा आला आहे. हे दुःख संथ मरणासारखे आहे, पण रेंगाळत्या मरणाची दुंदळी, क्षीण तगमग मात्र यात नाही. उलट एक गाढ श्रद्धा आणि अभंग विश्वास आहे, तितकीच कणखर स्वीकारशीलताही आहे. इथे कल्पना येतात, त्याही भावनेची सावली बनून. रिकाम्या घरात खडबड करणारे उंदीरही काही न सापडल्याने लवकरच आपल्याला सोडून जातील असे सांगताना ती म्हणते, "लवकरि हेही सोडतील सदनाला, गणगोत जसे आपणाला !" मोडक्या चंद्रमौळी घराचे करकर वाजणारे दार जणू कण्हतकण्हत आपल्या दुर्दैवाची कहाणीच जगाला सांगत आहे, असे तिला वाटते ! दत्तांच्या या कवितेमध्ये दुःखाची व्याकुळ, जीवघेणी तडफड दिसणार नाही तर दुःखाच्या सतत सहवासाने इथे मूर्तिमंत दुःखच गंभीर, मूक होऊन साक्षात पुढे ठाकल्यासारखे वाटते ! आणि त्यापुढे रसिकमनही विनम्र झाल्यावाचून राहात नाही. या कवितेत लय, चाल, भाषा, भावना, कल्पना या सर्व घटकांचा एक हृदयंगम समन्वय होऊन ही अजोड, एकात्म कलाकृती निर्माण झाली आहे.

दत्तांच्या शैलीने संस्कृतचे गाढ परिणामही समर्थपणे आणि सहजपणे पेलले होते, नव्हे, ते त्यांच्या भाषेशी एकजीव झाले होते. म्हणूनच दत्तांच्या संस्कृतप्रचुर भाषेतही ओघ, सौष्ठव आणि सहजता जाणवते. क्लिष्टतेचा, काठिण्याचा मागमूसही तिथे आढळत नाही. ही सहजता हा त्यांच्या शैलीचाच नव्हे, तर अनुभवरूपाशी

समरस होणाऱ्या त्यांच्या काव्यप्रकृतीचाच तो अविभाज्य भाग होता! दत्तांची एकूण अभिव्यक्ती काव्यदृष्टीचे जुने संकेत बाजूला सारून एका मुक्त आविष्काराकडे झुकत असल्याची साक्ष त्यांच्या अनेक भावकवितांमध्ये मिळते परंतु "बा नीज गडे" या अंगाईगीतामध्ये त्यांच्या भाषेने जे साधे, अनलंकृत, घरगुती रूप धारण केले आहे, ते खरोखर रसिकमनाला भिडणारे आणि हेलावून सोडणारे आहे. आशय आणि अभिव्यक्ती यांमधील एकात्मतेची ही जाण दत्तांच्या ठिकाणी अंगभूतच असावी. या कवितेत तिचाच उत्कर्ष झाला आहे.

"उत्तररामचरित्" या भवभूतीकृत संस्कृत नाटकाच्या मराठी अनुवादाचा संकल्प दत्तांनी आपल्या आयुष्याच्या अखेरच्या वर्षात सोडला होता. नाटक या वाङ्मयप्रकारातही त्यांना स्वारस्य होते. साहजिकच नाट्यात्मता हा त्यांच्या प्रतिभेचाच एक महत्त्वाचा गुणधर्म ठरला. या नाट्यात्म प्रतिभेमधूनच परचित्तप्रवेशाची किमया त्यांना अवगत झाली, तिचेच अत्यंत भावपूर्ण प्रत्यंतर दत्तांच्या या अंगाईगीतामध्ये येते. हे करुण गीत आज मराठी संचिताचा, संस्कृतीचाच एक अपरिहार्य भाग होऊन बसले आहे! रसिक कवीला विसरतात, त्याच्या कलाकृतीला मात्र स्मरतात, हाच कलेचा खरा गौरव आणि कलावंताचे खरे मोठेपण! ते दत्तांना निःसंशय लाभले. हे या अल्पायुषी कवीचे फार मोठे भाग्य होय!

दत्तांचे अकाल निधन ही एक दुर्दैवी घटना असली, तरी त्यांच्या काव्याच्या मूल्यमापनामध्ये त्यांचे 'अकाल निधन' हे रसिक मनाला हळवे करणारे एक प्रमादजन्य मूल्य ठरू नये अशी दक्षता या विवेचनामध्ये सर्वत्र घेतली आहे. या विवरणाचा समारोप करताना अखेर प्रश्न उद्भवतात ते हेच की, कवी दत्तांची गुणवत्ता, त्यांचे दत्तपण अखेर कशात होते? मराठी कवितेच्या महत्त्वपूर्ण अशा स्थित्यंतराच्या ज्या काळात त्यांची कविता जन्मली, त्या स्थित्यंतरामध्ये, नवप्रवर्तनामध्ये दत्तांचा सहभाग कोणता होता?

दत्तांनी आपल्या शिशुगीतांनी मराठी काव्यात एक बहुमोलाचा स्वतंत्र प्रवाह निर्माण केला यात शंका नाही. हे पहिलेवहिले श्रेय सर्वस्वी त्यांचेच आहे. आज मराठी कवितेत शिशुगीतांना जे उधाण आले आहे त्यांची सच्ची आणि हृदयंगम सुरवात दत्तांच्या या मोजक्या शिशुगीतांपासूनच मानावी लागेल, इतके त्यांचे मूलगामी महत्त्व आणि सौंदर्य आहे.

दत्तांच्या निसर्गकवितेला काही अपरिहार्य मर्यादा पडल्या असल्या तरीही निसर्गाकडे पाहाण्याची एक सजीव, सचेतन दृष्टीही त्यांच्याच निसर्गकाव्यात प्रामुख्याने आढळते. पुढील पिढीतील बालकवींच्या लावण्यमयी कवितेत याच वैशिष्ट्यांचा अत्यंत आल्हादकारी विकास झाला, उत्कर्ष झाला. म्हणूनच निसर्गाच्याच माध्यमातून आपल्या भावभावना व्यक्त करण्याचे, आणि निसर्गकवितेलाच आपली भावकविता बनविण्याचे दत्तांचे वैशिष्ट्य या संदर्भात नाकारता येणार नाही.

इंग्रजी रोमँटिक कवितेची जवळून ओळख दत्तांप्रमाणेच त्यांच्या इतर समकालीन कवींनाही झाली होती. परंतु भावगीताचे ( Lyric ) खरे हार्द, खरे अंतरंग दत्तांनी आंतरिक जाणिवेनेच ओळखले होते, आत्मसात केले होते. याचीही स्पष्ट जाणीव दत्तांच्या मोजक्या पण उत्कट भावगीतांमध्ये येते. दत्तांच्या या भावगीतातील आत्मलेखन जितके सुस्पष्ट तितकेच हृदयस्पर्शी आणि उत्कट आहे. मराठी कविता परंपरेच्या आणि संकेतांच्या बंधनांतून मुक्त झाली पाहिजे, प्रगती आणि काळ यांच्या अनुरोधाने पालटली पाहिजे याचीही निश्चित जाणीव दत्तांना ऐन तारुण्यातही झाली होती आणि या नवप्रवर्तनाच्या काही अस्सल खुणा त्यांच्याही काव्यात उमटल्या होत्या. परंतु दत्तांना दत्तपण देणारे त्यांचे खरेखुरे वैशिष्ट्य म्हणजे त्यांच्या काव्यात आढळणारे " मनोविकारांचे चित्रलेखन " हेच होय. हे वैशिष्ट्य आज अधिकच मोलाचे आणि महत्त्वाचे ठरते याचे कारण, आधुनिक मराठी कवितेच्या विकासातील, तिच्या अभिव्यक्तीच्या प्रगतीमधील एका महत्त्वाच्या टप्प्याची चाहूल दत्तांच्या वरील शब्दांमध्ये आणि त्यांच्या कवितांमध्येही स्पष्टपणे लागते. आशय आणि अभिव्यक्तीची एकरूपता साधताना आधुनिक कविता ज्या प्रतिमा – प्रतीकांच्या वाटेने पुढे जात आहे, तिची प्रसादचिन्हेच दत्तांच्या या भावकाव्यात उमटली आहेत. दत्तांचे दत्तपण अखेर त्यातच आहे !

अर्वाचीन मराठी कवितेच्या नवप्रवर्तनामध्ये दत्तांचा सहभाग होताच, परंतु आधुनिक मराठी कवितेच्या विकासाची दिशाही त्यांनी अभावितपणे का होईना, फार पूर्वीच मनोमन पाहिली होती. म्हणूनच या तरुण कवीच्या अपमृत्यूने मराठी कवितेची हानी झाली, या निष्कर्षापर्यन्त येताना मनाला पुन्हा एकदा खिन्नता आल्याखेरीज राहात नाही. दत्त हा अर्वाचीन मराठी कवितेच्या क्षितिजावर उगवलेला पहाटेचा तारा होता. हे नक्षत्र फार लवकर अंतर्धान पावले, परंतु त्याच्या कोवळ्या कोमल किरणांनी या कविता आजही उजळलेल्या आहेत.

परिशिष्ट १

# कवि दत्त यांच्या काही कविता



## नवें पान उघडलें

होती सृष्टि कुठे ? उजेड अथवा अंधार होता कुठें ?
होता मात्र तदा जगज्जनक तो, हा काळ होता कुठे ?
कोणी कांहिं कुठें कधींहि नव्हतें, तेव्हा जगन्नायक
इच्छासाधन घेउनी बनविता झाला महापुस्तक. १

कोरें पुस्तक निर्मिलें प्रथम तें आकाश ज्या बोलती,
नाना तारकपुंज आंत लिहिले त्यांची न कोणा मिती;
येथें काढियलीं यथाक्रम तरू पक्षी पशू माणसें
“ होवो हें ” म्हणतांच तें उमटलें जागीं जसेंच्या तसें. २

झालें पुस्तक पूर्ण विश्व म्हणतों, ज्याला इथें आपण,
वाचाया बसला प्रभू, उलटितो पानें स्वयें वाचुन;
त्यानें आजवरी किती उलटिलीं पानें तया ठाउक,
जाणे तोच पुढील यांत उरलीं पानें किती आणिक. ३

जन्मापासुन पाहिलीं वरवरीं तेवीस पानें पुरीं,
कोणा माहित आणखी कितितरी पाहीन या भूवरीं ?
दृष्टीदेखत आज पान सरलें; आलें नवें बाहिर,
जाणूं काय अम्हीं शुभाशुभ किती वाचील तो यावर ? ४

( इंदूर : सराफा : १ जानेवारी १८९८, प्रकाशन : बालबोधमेवा )

## निज नीज माझ्या बाळा !

बा नीज गडे नीज गडे लडिवाळा !
निज नीज माझ्या बाळा ॥

रवि गेला रे सोडुनि आकाशाला,
धन जैसें दुर्भाग्याला.
अंधार वसे चोहिकडे गगनांत,
गरिबाच्या जेवि मनांत.
बघ थकुनि कसा निजला हा इहलोक,
मम आशा जेंवि अनेक.
खडबड हे उंदिर करिती,
कण शोधायाते फिरती,
परि अंतीं निराश होती;
लवकरि हेही सोडितील सदनाला,
गणगोत जसे अपणाला.

बहु दिवसांच्या जुन्या कुडाच्या भिंती;
कुजुनी त्या भोकें पडतीं.
त्यांमधुनी त्या दाखविती जगताला
दारिद्र्य आपुलें बाळा.
हें कळकीचें जीर्ण मोडकें दार
कर कर कर वाजे फार;
हें दुःखानें कण्हुनि कथी लोकांना
दारिद्र्य आपुलें बाळा.
वाहतो फटींतुनि वारा;
सुकवीतो अश्रूधारा;
तुज नीज म्हणे सुकुमारा !
हा सूर धरी माझ्या या गीताला
निज नीज माझ्या बाळा !

जोंवरती हें जीर्ण झोपडें अपुलें
दैवानें नाहीं पडलें,
तोंवरती तू झोंप घेत जा बाळा;
काळजी पुढें देवाला!
जोंवरती या कुडींत राहिल प्राण,
तोंवरि तुज संगोपीन;
तदनंतरची करूं नको तूं चिंता;
नारायण तुजला त्राता.
दारिद्र्या चोरिल कोण?
आकाशा पाडिल कोण?
दिग्वसना फाडिल कोण?
त्र्यैलोक्यपती आता त्राता तुजला,
निज नीज माझ्या बाळा!

तुज जन्म दिला सार्थक नाहीं केलें;
तुज कांहि न मी ठेवीलें.
तुज कोणि नसे, छाया तुज आकाश;
धन दारिद्र्याची रास;
या दाहि दिशा वस्त्र तुला सुकुमारा;
गृह निर्जन रानीं थारा;
तुज ज्ञान नसे अज्ञानाविण कांहीं;
भिक्षेविण धंदा नाहीं
तरि सोडुं नको सत्याला,
धन अक्षय तेंच जिवाला;
भावें भज दीनदयाळा;
मग रक्षिल तो करुणासागर तुजला.
निज नीज माझ्या बाळा!

(इंदूर : सराफा, सप्टेंबर १८९७, प्रकाशन– "रक्ततरंगिणी" १९१०

# असंतुष्ट पति

विद्या दावुं कुणा ? कुणा रसिकता दावूं ? कुणा चातुरी ?
केलेली कविता कुणास शिकवूं ? दावूं कुणा माधुरी ?
अंगीं खेळुनि राहिला सुरस हा शृंगार दावूं कुणा ?
ऐसा व्यर्थ कशास जन्म दिधला धात्या ! अरे दुर्जना ?

प्रेमें निंदिल कोण ? कोण रसिका कोपेल माझ्यावरी ?
ग्लानी हारिल कोण ? कोण मजला रंजील नानापरी ?
कोणाच्या वदना बघूनि रिझवूं उद्विग्न माझ्या मना ?
ऐसा व्यर्थ कशास जन्म दिधला धात्या ! अरे दुर्जना ?

कोणाचे सुख साधुनी सुख मनीं मानूं ? कुणा शांतवूं !
कोणाला विनवूं ? कुणावर रुसूं ? प्रेमा कुणा दाखवूं ?
वाटे जीव नको, असार सगळा संसार वाटे सुना !
ऐसा व्यर्थ कशास जन्म दिधला धात्या ! अरे दुर्जना ?

वृद्धाला तरुणी, कुरूप पतिला पत्नी मिळे सुंदरी,
मुर्खा बुद्धिमती मिळे, अरसिका शृंगारभोक्ती खरी;
ऐशीं योजिशि जोडपीं विषम तूं ! ही कां तुझी योजना ?
ऐसा व्यर्थ कशास जन्म दिधला धात्या ! अरे दुर्जना ?

त्यापक्षीं मज मूर्ख अंध करुनी देता बरी बायको,
होता तो उपकार; हाय ! परि ती आशाहि आतां नको !
संसारीं मज गोंवुनी, मज नको ऐसी दिली अंगना !
ऐसा व्यर्थ कशास जन्म दिधला धात्या ! अरे दुर्जना ?

(१८९७)

# मावळ्यांस आमंत्रण

चला मावळे वीर हो ! या घडीला;
धनी संगरा बोलवीतो तुम्हाला;
लढाया चला सोडुनी सर्व काज,
रणीं दाखवा शत्रुला शौर्य आज

चला सज्ज व्हा, घ्या यशस्वी हत्यारें,
चला ज्वान हो ! वृद्ध हो ! आज सारे,
चराया गुरें राहुं द्यावीं वनींच;
असें सांगतो मी न; सांगे धनीच.

त्यजा चालत्या नांगराला तसाच,
धन्याची करा चाकरी आज साच.
पुरें तोडणें वृक्ष, घ्यावी कुठार
रणीं शत्रुला मारण्या आज ठार,

पुरें जेवणें, हातचा घांस टाका.
उठा सज्ज व्हा, दुंदुभीनाद ऐका,
नका घालवूं वेळ होतो उशीर,
रणीं पाहतें शत्रुचें वाट शीर

उठा आवळा कंबरा वेळ झाला;
उठा ढाल घ्या, खड्ग घ्या, लांब भाला.
कुणी गोफणी, तीर वा घ्या कृपाण,
अरीं–संगरीं माजवावें तुफान.

निघा सत्वरी वादळीं जेंवि लाटा;
चला वेळ झाला, धरा चोरवाटा,
जमा इष्ट जार्गी, पळा वायुवेगें
त्यजा आळसा चित्त ठेवा न मागे.

चला मावळे वीर हो ! या घडीला;
शिवाजी रणीं बोलवीतो तुम्हांला
लढाया चला, सोडुनी सर्व काज;
रणीं दाखवा शत्रुला शौर्य आज.

(बडोदें, १८९८)

# विश्वामित्रीच्या कांठीं

बघुनि मन धालें
साफल्य दृष्टिचे झालें !
पाऊस बर्फाचा जणुं पडतो;
रजताचा जणुं मेघ वितळतो;
किंवा चंद्रकांत पाझरतो;

जणूं शीतांगी—
मत्प्रिया मला आलिंगी !
शीतल चंदनरसांत पडलों !
अथवा अमृतडोहिं बुडालों;
किंवा सुखस्वप्नीं सांपडलो;

न कळे कांहीं—
जिव वेडावुनि हा जाई !
शांतिदेवता निराकारिणी
वसते जणुं या मंगल स्थानीं;
सांगे मजला या उद्यानीं,

चंचल बाला ! —
" बघ इथें जगन्नाथाला ! "
सृष्टिसुंदरी नटली थटली
सूक्ष्म धवल वल्कला नेसली;
खुलली जणुं सुमवेली फुलली;

रम्य ही शोभा—
हिजपुढें काय ती रंभा !
शांत तटिनी जणुं पथ स्फटिकाचा
जातिपुष्पपथ वनदेवीचा
किंवा ओघ सजिव रजताचा

कीं रत्नाची—
मेखलाच उद्यानाची !
विश्वामित्रींजलिं या कालीं
तटवनभूमी बिंबित झाली;
वरती तैसें दिसतें खालीं;

अद्भुत झालें—
पाताळ आज पाहीलें !
तारांगणही स्पष्ट बिंबलें,
स्नाना जणुं हे मुनि अवतरले;
तेजोनिधि कीं ऋषीं बैसलें

ध्यान धरोनी—
जलसमाधिस्थ होवोनी !
शशिरायाही आंत उतरला,
कलहंसापरि पोहुं लागला;
तटिनीने जणुं हृदयीं धरिला;

प्रेमळ कांत –
पाहुनी इथें एकांत !
जेथें असली श्रेष्ठ मंडळी;
तिथेंच गरिबा जागा दिधली;
शंका सखये ! परि उद्भवली,

खरी मम काया –
उदकांमधिं वा भूवरि या !
वरतींखालीं दिसते गगन;
मध्यें लंबित अपुलें भवन;
वातावरणीं आधाराविण

गोजिरवाणी –
फेंकिला चेंडु हा कोणी !
वरतीं खालीं ही शशिकांती;
द्विगुणित शोभा द्विगुणित शांती;
द्विगुणित आनंदाची भरती,

दृष्टि बावरली –
वर पाहूं किंवा खालीं !
स्मरणशक्तिके, जागृत होई;
दर्शनदुर्लभ शोभा पाहीं,
विसरूं नको बघ यांतिल काही;

वारंवार –
कोठुनी असे दिसणार ?

( – ८ ऑक्टोबर १८९७ बडोदे, प्रकाशन– मनोरंजन– डिसेंबर १८९८ )

## दीपका

स्नेहानें जळशी, तयासह दिव्या ! तूं राहसी अक्षय;
स्नेहावांचुन जीवही न धरिशी ऐसा तुझा निश्चय.
स्नेहाचा लवही मिळे न मजला, प्राणास कंटाळलों,
स्नेहावांचुन कोरडाच जळतों – हें काय मी बोललों ?
कानीं हें पडतांच काय तुजला वाटेल भाई बरें ?
वेड्याचें वच मानशील सखये ! कैसे बरे तूं खरें ?
मित्रा, तूं म्हणशील खास बनला वेडा तुझा सोबती;
बोला – कांहिं म्हणा वदून चुकलों आतां न त्याची क्षिती !

( अहमदनगर – १८९७ )

## बोलत कां नाहीं ?

बोलत कां नाहीं, झालें काय तुला बाई ?

चोळी परकर नवीन केले,
दागदागिने सर्व घातले,
चूल बोळके जवळ मांडिलें,
दिलें सर्व कांहीं, तरी तूं बोलत कां नाहीं ?

आई तुजला रागें भरली ?
कीं दादानें खोडी केली ?
रुसली माझी बाळ सोनुली,
काय करूं बाई, गडे तूं बोलत कां नाहीं ?

सांग, तुला कां भूक लागली ?
देऊं काय मी लाटुनि पोळी ?
रुसूं नको, घे ही बघ झाली
छकुले ! ये खा ही गडे ! तूं बोलत कां नाहीं ?

शेजारिण वेणुचा बाहुला
नवरा तुजला आज पाहिला,
म्हणुनि लाजुनी धरिशि अबोला ?
ओळखलें बाई, नको तूं सांगुं नको कांहीं !

( इंदूर – सराफा : १७ ऑक्टोबर १८९७ )

परिशिष्ट २

# संदर्भ सूची




१. **दत्तांची कविता**, संपा. वि. द. घाटे

२. **नवें पान**, संपा. मा. गो. देशमुख

३. **कवि दत्त** ( लेख ) – माधव त्र्यंबक पटवर्धन, "अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक" खंड पहिला, संपा. गं. दे. खानोलकर

४. **आधुनिक मराठी काव्याचे प्रणेते**, भाग १, भ. श्री. पंडित

५. **अर्वाचीन मराठी काव्य**, रा. श्री. जोग

६. **आधुनिक मराठी कविता**, भ. श्री. पंडित

७. **आधुनिक मराठी काव्यातील अंतःप्रवाह**, वा. भा. पाठक

८. **आधुनिक मराठी वाङ्मयाचा इतिहास**, भा. १, अ. ना. देशपांडे

९. **दिवस असे होते** ( आत्मचरित्र ), वि. द. घाटे